॥ श्रीहरिः ॥

429▲

# गृहस्थाश्रमात कसे वागावे ?

## गृहस्थमें कैसे रहें ? ( मराठी )



गीताप्रेस गोरखपुर
GITA PRESS, GORAKHPUR

स्वामी रामसुखदास

॥ श्रीहरिः ॥

# गृहस्थाश्रमात कसे वागावे ?

## गृहस्थमें कैसे रहें ? ( मराठी )

त्वमेव माता च पिता त्वमेव
त्वमेव बन्धुश्च सखा त्वमेव।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव
त्वमेव सर्वं मम देवदेव॥

स्वामी रामसुखदास

**पुस्तकें यहाँ भी उपलब्ध हैं—**

**गीताप्रेस, गोरखपुरकी पुस्तक-दूकान**

१-सूरत— वैभव एपार्टमेन्ट, भटार रोड ✆ ( 0261 ) 2237362, 2238065
२-मुम्बई— 282, सामलदास गाँधी मार्ग ( मरीन लाईन्स स्टेशनके पास ) ✆ ( 022 ) 22030717
३-नागपुर— 851, न्यू इतवारी रोड ✆ ( 0712 ) 2734354
४-जलगाँव— 7, भीमसिंह मार्केट, रेलवे स्टेशनके पास ✆ ( 0257 ) 2226393
५-औरंगाबाद— रेलवे स्टेशन, प्लेटफार्म नं० १
६-हैदराबाद—दूकान नं० 41, 4-4-1, दिलशाद प्लाजा, सुल्तान बाजार ✆ ( 040 ) 24758311

**सं० २०७१ तीसवाँ पुनर्मुद्रण ५,०००**

कुल मुद्रण २,८७,०००

**❖ मूल्य—₹ १५**
**( पंद्रह रुपये )**

प्रकाशक एवं मुद्रक—

**गीताप्रेस, गोरखपुर—२७३००५**

**( गोबिन्दभवन-कार्यालय, कोलकाता का संस्थान )**

फोन : ( ०५५१ ) २३३४७२१, २३३१२५०; फैक्स : ( ०५५१ ) २३३६९९७
e-mail : **booksales@gitapress.org** website : **www.gitapress.org**

429_Grihath Me Kaise Rahe_Section_1_1_Back

॥ श्रीहरिः ॥

# नम्र निवेदन

सध्याच्या काळामध्ये हिंदु संस्कृतीमधील 'वर्ण-आश्रम-व्यवस्था, छिन्न विच्छिन्न होत आहे. चारही आश्रमांचा मुख्य आधार असलेल्या गृहस्थाश्रमाची अवस्था तर अत्यंत दयनीय झाली आहे. 'गृहस्थी' अनेक प्रकारच्या विळख्यात सापडला असून तो अत्यंत नैराश्यपूर्ण, अशांत आणि तणावयुक्त जीवन जगत आहे. परमश्रद्धेय श्रीस्वामीजी महाराजांकडे देखील अशा प्रकारचे अनेक स्त्री-पुरुष येतात आणि आपल्या व्यक्तिगत जीवनातील समस्या त्यांच्या समोर ठेवून त्यावर योग्य तोडगा प्राप्त करतात. त्यामुळे एका अशा प्रकारच्या पुस्तकाची आवश्यकता वाटावयास लागली की ज्यामध्ये गृहस्थी-विषयी गोष्टींचा—यथायोग्य तोडगा मिळू शकेल. हे पुस्तक हीच आवश्यकता पूर्ण करते. वाचकांना नम्र निवेदन आहे की त्यांनी या पुस्तकाचे मनःपूर्वक वाचन करुन अध्ययन करावे; आणि इतरानांही हे पुस्तक वाचण्याविषयी प्रेरणा द्यावी. प्रत्येक घरामध्ये हे पुस्तक संग्रही असावे. विवाहादि शुभ प्रसंगी हे पुस्तक 'भेट' म्हणून द्यावे.

ह्या पुस्तकाव्यतिरिक्त परमश्रद्धेय श्री स्वामीजी महाराजांनी लिहिलेली हिन्दी मधील इतर दोन छोटी-छोटी पुस्तके देखील 'गृहस्थी' ला अत्यंत उपयोगी पडणारी आहेत. त्यांची नांवे आहेत—'सन्तानका कर्तव्य' आणि 'महापापसे बचो'. वाचकांना विनंती करण्यात येत आहे की त्यांनी ही दोन पुस्तके देखील अवश्य वाचून लाभ घ्यावा.

**—प्रकाशक**

॥ श्रीहरिः ॥

# विषय-सूची

**विषय** **पृष्ठ-संख्या**





॥ ॐ श्रीपरमात्मने नमः ॥

# "गृहस्थाश्रमात कसे वागावे ?"

**रुद्रो मुण्डधरो भुजंगसहितो गौरी तु सद्भूषणा**
**स्कन्दः शम्भुसुतः षडाननयुतस्तुण्डी च लम्बोदरः।**
**सिंहक्रेलिममूषकं च वृषभस्तेषां निजं वाहन-**
**मित्थं शम्भुगृहे विभिन्नमतिषु चैक्यं सदा वर्तते ॥**

[भगवान् शंकर मुंडमाला आणि सर्प धारण करणारे आहेत, आणि पार्वती दिव्य अलंकार धारण करणारी आहे, त्यांचे पुत्र कार्तिकस्वामी यांना सहा मुखे असून गणपतीला लांब सोंड व विशाल उदर आहे, भगवान् शंकरादिची आपापली वाहने—बैल, सिंह, मोर आणि उंदीर—हे देखील एकमेकांचे भक्षण करणारे आहेत असे असूनही भगवान् शंकराच्या विभिन्न (परस्परविरोधी) स्वभाव असणाऱ्या कुटुंब सदस्याच्या परिवारामध्ये नेहमी ऐक्य नांदत असते (अशा प्रकारे गृहामध्ये निरनिराळया व्यक्ति सोबत आपल्या गर्वाचा (अभिमानाचा) आणि सुखभोगांचा त्याग करून दुसऱ्याचे कल्याण आणि सुखाचा उद्देश मनात ठेवून आपसामध्ये प्रेमपूर्वक ऐक्यभावना वाढवावी.]

## १. गृहस्थ-धर्म

**सानन्दं सदनं सुताश्च सुधियः कान्ता न दुर्भाषिणी**
**सन्मित्रं सुधनं स्वयोषिति रतिश्चाज्ञापराः सेवकाः।**
**आतिथ्यं शिवपूजनं प्रतिदिनं मृष्टान्नपानं गृहे**
**साधोः संगमुपासते हि सततं धन्यो गृहस्थाश्रमः॥**

'घरात सर्व सुखी आहेत, पुत्र बुद्धिवान् आहे, पत्नी मधुरभाषिणी आहे, चांगले मित्र आहेत, आपल्या पत्नीचा संग आहे, प्रतिदिवस

अतिथी सत्कार व भगवान् शंकराचे पूजन होते, शुद्ध पवित्र भोजन आहे आणि संताचा संग होत असतो असा जो गृहस्थाश्रम आहे, तो धन्य आहे.'

**प्रश्न**—विवाह का करावा? विवाह करणे आवश्यक आहे काय?

**उत्तर**—आपल्या धर्मग्रंथामध्ये दोन प्रकारच्या 'ब्रम्हचाऱ्यांचे' वर्णन आढळते—'नैष्ठिक, आणि 'उपकुर्वाण' जे आजन्म ब्रम्हचर्याचे पालन करतात त्यांना 'नैष्ठिक' ब्रम्हचारी असे म्हणतात; आणि जे आपल्या विवेकाच्या योगाने आपली भोगेच्छा नष्ट करण्यामध्ये असमर्थ ठरतात आणि केवळ भोगेच्छा नष्ट करण्यासाठीच विवाह करतात त्यांना 'उपकुर्वाण' ब्रम्हचारी असे म्हणतात, तात्पर्य असे आहे की जे विवेकाच्या योगाने भोगेच्छेला नष्ट करू शकत नाहीत त्यांनी विवाह करून पहावा, त्यांना असा अनुभव येईल की 'ही भोगेच्छा भोग भोगल्यामुळे नष्ट होणारी नाहीं;' त्यामुळेच गृहस्थाश्रमानंतर वानप्रस्थाश्रमाचा आणि संन्यासाश्रमाचा अंगिकार करावयास सांगितले आहे, नेहमी गृहस्थाश्रमी राहून भोग भोगत राहणे हे माणुसकीचे लक्षण नाहीं, ज्याच्या मनात भोगेच्छा आणि जो वंश-परंपरा टिकवू इच्छितो (वंशसातत्य टिकविण्यासाठी) तसेच वंशसातत्य टिकविण्यासाठी त्याला भाऊ वगैरे कोणीच नाही त्याला केवळ भोगेच्छा नष्ट करण्याच्या उद्देशाने अथवा वंशसातत्य टिकविण्यासाठी विवाह करणे आवश्यक आहे, जर उपरोक्त दोन्हीही प्रकारच्या इच्छा मनात नसतील तर विवाह करण्याची आवश्यकता नाही शास्त्रामध्ये 'निवृत्ती' ला श्रेष्ठ म्हटले गेले आहे—

**'निवृत्तिस्तु महाफला'**

**प्रश्न**—कलियुगामध्ये तर संन्यास घेण्याला मनाई केली आहे तर मग मनुष्य 'निवृत्त' कसा होईल?

**उत्तर**—कलियुगामध्ये संन्यास घेण्याची मनाई याकरीता केली गेली आहे की, कलियुगामध्ये संन्यास—धर्माचे पालन करणे फार कठीण आहे, त्यामुळे मनुष्य योग्य प्रकारे संन्यास-धर्माला निभवू शकत नाही, म्हणून ज्याप्रमाणे सरकारी कर्मचारी नोकरीतून निवृत्त होतात त्याप्रमाणे मनुष्याने देखील आपल्या गृहकार्यामधून निवृत्त व्हावयास पाहिजे आणि आपल्या मुलांबाळांवर घराचा कारभार सोपवून घरी राहूनच भजन-पूजन, स्मरण इत्यादी पारमार्थिक कामे करावित, मुलाबाळांची इच्छा असेल तरच भोजन, वस्त्रे इत्यादीचा निर्वाहविषयक संबंध ठेवावा; मुलाबाळांची इच्छा नसेल तर त्याचाही त्याग करावा, उदरनिर्वाह कसा होईल, याची मुळीच काळजी करू नये कारण—

**प्रारब्ध पहले रचा, पीछे रचा सरीर।**
**तुलसी चिन्ता क्यों करे, भज ले श्रीरघुवीर॥**

**प्रश्न**—गृहस्थीचा खरा धर्म कोणता आहे ?

**उत्तर**—ब्रम्हचर्याश्रम, गृहस्थाश्रम, वानप्रस्थाश्रम आणि संन्यासाश्रम—या चारही आश्रमांची सेवा करणे हा गृहस्थाचा खरा धर्म आहे। कारण 'गृहस्थ' च सर्वांचा माता-पिता, पालक आणि संरक्षक आहे—म्हणजेच गृहस्थापासूनच ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ आणि संन्यासी उत्पन्न होतात, त्यांचे पालनपोषण आणि संरक्षण होते. म्हणून चारही प्रकारच्या आश्रमांचे पालनपोषण करणे हाच गृहस्थाचा खरा धर्म आहे,

अतिथींचा सत्कार करणे गाय, म्हैस, शेळी, मेंढी इत्यादी प्राण्यांच्या सुख सुविधेकडे लक्ष देणे, घरात आढळून येणाऱ्या उंदरासारख्या प्राण्यांना देखील घरातील एक सदस्य मानणे, त्या सर्वांचे पालनपोषण करणे हा गृहस्थाचा खरा धर्म आहे। तसेच ऋषि-मुनिंची सेवा करणे; पितरांना पिंडदान करणे, भगवंताची सेवा (भजन-स्मरण) करणे हा सुद्धा गृहस्थाचा खरा धर्म होय,

**प्रश्न**—गृहस्थाश्रमात कसे वागावयास पाहिजे?

**उत्तर**—हे मनुष्य शरीर आणि त्यामध्ये देखील 'गृहस्थाश्रम' ही स्वत:चा उद्धार करुन घेण्याची पाठशाला आहे, भोग भोगण्यासाठी आणि आरामात पडून राहण्यासाठी हे मनुष्य शरीर मिळालेलेच नाही। ***'एहि तन कर फल बिषय न भाई'*** (मानस, उत्तर० ४४। १) शास्त्रविहित यज्ञादि कर्मे करुन ब्रम्हलोकादिची प्राप्ती करून घेणे ही कांही फार मोठी गोष्ट नाही कारण त्या ठिकाणी जाऊन पुन्हा परत यावेच लागते—'**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनः**' (गीता ८। १६). म्हणूनच प्राणीमात्राच्या हिताची भावना मनात ठेवूनच गृहस्थाश्रमात वागले पाहिजे. आणि आपल्या शक्तिनुसार तन, मन, बुद्धि, योग्यता, अधिकार, इत्यादीच्या योगाने दुसऱ्याला सुख देण्याचा प्रयत्न केला पाहिजे. दुसऱ्याच्या सुखाकरीता आपल्या सुखाचा त्याग करणे हीच माणुसकी आहे.

**प्रश्न**—गृहस्थाश्रमामध्ये अनेक प्रकारची कामे करतांना जी हिंसा होते तिच्यापासून सुटका कशी करुन घ्यावी?

**उत्तर**—गृहस्थाश्रमामध्ये रोज पाच प्रकारची हिंसा होत असते—(१) स्वयंपाकघरात स्वयंपाक करतांना अग्नीमध्ये मुंग्यासारखे लहान जीव मरतात, लाकडामध्ये राहणारे प्राणी देखील मरतात.

(२) पाणी ठेवण्याचे भांडे इकडे-तिकडे हलवितांना कांही जीव मरतात, (३) झाडून काढताना कांही जीवांची हत्या होते (४) जात्यामध्ये दळण दळतांना अनेक जीव मरण पावतात. (५) उखळात धान्य कुटतांना देखील काही जीवांची हत्या होत असते, या अनेक प्रकारच्या हिंसेपासून सुटका मिळविण्यासाठी गृहस्थाने दररोज बलिवैश्वदेव, पंचमहायज्ञ करावयास पाहिजे. जे लोक सर्वतोपरी भगवंताला शरण जातात त्यांना ही हिंसा लागत नाही, ते सम्पूर्ण पातकापासून मुक्त होतात.

**प्रश्न**—आम्ही दळतही नाही आणि 'कांडतही' नाही, तर मग आम्हाला हिंसा कशी लागेल?

**उत्तर**—आपण दळलेले आणि कांडलेले धान्य स्वत:साठी वापरतो त्यामुळे या प्रसंगी होणारी हिंसा आपणाला लागणार.

**प्रश्न**—शेतीमध्ये अनेक जीवांची हिंसा होत असते, त्यामुळे शेतकऱ्यांनी शेती करुच नये काय?

**उत्तर**—शेतकऱ्यांनी शेती अवश्य करावी परंतु त्यावेळी हिंसा घडून येणार नाही याकडे लक्ष द्यावे, शेतकऱ्यानी शेती करावी असे शास्त्रविधान असल्यामुळे त्यांना 'पाप' कमी प्रमाणात लागते. त्यामुळे पापाला भिऊन आपल्या कर्तव्याचा त्याग कधीही करु नये, 'हिंसा घडून येऊ नये' अशा प्रकारे सावध चित्ताने शेतीमधील कामे करावित.

**प्रश्न**—आजकाल शेतकरी पीकसंरक्षणासाठी विषारी कीटकनाशके पिकांवर फवारतात; हे योग्य आहे काय?

**उत्तर**—शेतकऱ्यांनी असे कधीही करु नये. पूर्वीच्या काळी शेतकरी विषारी द्रव्ये पिकांवर फवारित नव्हते त्यावेळी धान्य स्वस्त भावाने मिळत असे. आज होत असलेल्या हिंसेमुळे धान्य 'महाग' होत आहे. वरकरणी पाहता जीवांची हत्या केल्यामुळे धान्योत्पादन वाढत आहे असे दिसते परंतु याचा परिणाम कधीही चांगला होणार नाही.

**प्रश्न**—शास्त्रामध्ये 'गृहस्थीवर' पाच प्रकारचे 'ऋण' सांगितलेले आहेत—पितृऋण, देवऋण, ऋषिऋण, भूतऋण आणि मनुष्यऋण, यापैकी पितृऋण म्हणजे काय? आणि त्यापासून कोणत्या उपायांनी सुटका करुन घेता येते?

**उत्तर**—माता-पिता, वडील भाऊ-बहीण, आजी-आजोबा इत्यादी वडीलधाऱ्या माणसांच्या मृत्युनंतर जे 'कार्य' केल्या जाते

त्याला 'प्रेतकार्य' असे म्हणतात आणि परंपरागत चालत आलेली श्राद्ध, पिंडदानादी जी कार्ये पितरांच्या उद्देशाने केल्या जातात ती सर्व 'पितृकार्ये' आहेत. मृत्युनंतर प्राणी देवता, मनुष्य, पशु-पक्षी, भूत-प्रेत, वृक्ष-लता इत्यादी कोणत्याही प्रकारच्या योनीमध्ये गेला तरी त्याला 'पितर' ही संज्ञा प्राप्त होते.

आई-वडीलांच्या रज-वीर्यापासून शरीर निर्माण होते. आईच्या दुधाने आणि वडिलांनी मिळविलेल्या अन्नाने शरीराचे पालन पोषण होत असते. आई-वडील आपला विवाह करून देतात. अशा प्रकारे पुत्रावर मातापित्याचे, माता-पित्यावर आजी-आजोबांचे आणि आजी-आजोबावर पणजी-पणजोबाचे ऋण असते. परंपरागत चालत आलेल्या या पितृऋणापासून मुक्त होण्याकरीता, पितरांना सद्गती मिळण्याकरीता, त्यांच्या नावाने श्राद्ध-तर्पण आणि पिंडदानादि क्रिया करावयास पाहिजेत.

पुत्र आपल्या संपूर्ण हयातभर माता-पित्याच्या नावाने पिंडदानादी क्रिया करीत असतो. परंतु पुढे चालून पिंडदानादी क्रिया करण्याकरीता संतान-निर्मिती करणार नाही तर त्याची पितृऋणापासून मुक्तता होणार नाही, परंतु 'संतान' उत्पन्न झाल्यानंतर पितृऋणाची जबाबदारी त्याच्यावर न राहता ती त्याच्या पुत्राकडे जाते. पितर पिंडदानाची इच्छा करीत असतात. पिंडदान मिळाल्यामुळे ते सुखी आणि न मिळाल्यामुळे दुःखी होत असतात. पुत्राला पुत्र (संतान) नसेल तर पुढे आपणाला पिंडदान कोण करेल या भावनेने पितर दुःखी राहत असतात.

**प्रश्न**—पितरांच्या नांवाने केलेले पिंडदान त्याला मिळते काय?

**उत्तर**—पितरांच्या नावाने काहीही दिले तरी ते त्यांना प्राप्त होते (मिळते) पिंडदान त्यांना त्यांच्या योनीनुसार खाद्याच्या अथवा पेयाच्या रूपाने मिळते. उदा. पितर पशुयोनीमध्ये असतील तर

त्यांच्या नांवाने दिलेले अन्न 'गवत' बनून त्यांना मिळेल; आणि पितर देवयोनीमध्ये असतील तर 'अमृत' बनून त्यांना मिळेल तात्पर्य असे आहे की ज्या वस्तुमुळे, त्यांचा उदरनिर्वाह होतो ती वस्तु त्यांना मिळते. ज्याप्रमाणे भारतामधून अमेरिकेतील एखाद्या व्यक्तिला मनिऑर्डर द्वारे 'रुपये' पाठविले तर अमेरिकेत ते डॉलर बनून त्याला मिळतील त्याप्रमाणे आपण पितरांच्या नांवाने जे पिंडदान करतो, दान, पुण्य करतो ते पितर ज्या योनीमध्ये असतील त्यानुसार खाद्य अथवा पेयाच्या रूपाने पितरांना मिळते.

आज आपणाला मोठ्या आदराने जे अन्न-वस्त्र इत्यादी मिळत आहे ते आपण पूर्वजन्मी केलेल्या 'पुण्याचे' फळ देखील असू शकते. आणि आपल्या पूर्वजन्मीच्या पुत्र-पौत्रादिकानी केलेल्या श्राद्ध-तर्पणाचे फळ देखील असू शकते. कांहीही असो; परंतु ते आपले 'प्रारब्ध' आहे.

ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तिने बँकेमध्ये एक लाख रूपये जमा केले आहेत, त्यापैकी कांही रूपये स्वतःच्या नावाने; कांही पत्नीच्या नावाने; आणि काही पुत्राच्या नावाने (खात्यावर) जमा केले आहेत. तर तो व्यक्ति स्वतःच्या खात्यामध्ये जमा असलेली रक्कमच काढू शकतो; पत्नीच्या अथवा पुत्राच्या नावाने जमा असलेली रक्कम त्याला काढता येणार नाही. ती रक्कम तर त्याच्या पत्नीला आणि पुत्रालाच मिळणार. त्याप्रमाणे पितरांच्या नावाने जे पिंडदान केल्या जाते ते पितरांनाच मिळणार, आपणाला मिळणार नाही. होय, यामध्ये एक गोष्ट अशी आहे की आपण जीवंतपणी 'गये' ला (गया या तीर्थ-क्षेत्रामध्ये) जाऊन आपल्या नोवाने पिंडदान केले तर मृत्युनंतर ते आपणालाच मिळेल. गया या तीर्थाच्या ठिकाणी पशु पक्ष्यांच्या नावाने केलेले पिंडदान देखील त्यांना च मिळते. एका सत्पुरुषाचे आपल्या गायीवर फार प्रेम होते. ती गाय

मृत्यु पावल्यानंतर त्याला स्वप्नामध्ये अत्यंत दु:खी असलेली दिसत असे. त्याने 'गया' या तीर्थाच्या ठिकाणी जाऊन त्या गायीच्या नांवाने पिंडदान केले त्यामुळे नंतर तीच गाय त्याला स्वप्नामध्ये अत्यंत प्रसन्न असलेली दिसू लागली.

जसे आपल्याजवळ स्वत: कमावलेले तसेच वडील, आजोबा, पणजोबा इत्यादी पूर्वजांनी कमावलेले धन असते; तेंव्हा आपण स्वत: कमाविलेल्या धनावर आपला जेवढा अधिकार असतो तेवढा अधिकार पूर्वजांनी कमाविलेल्या धनावर नसतो. वंश परंपरेनुसार वडील—आजोबांच्या धनावर आपल्या पुत्र-पौत्रांचा अधिकार असतो. अशा प्रकारे पितरांना वंश परंपरेनुसार पुत्र-पौत्रांनी केलेले पिंडदानच मिळत असते म्हणून पुत्र-पौत्रावर वडील, आजोबा इत्यादीकरीता पिंडदान करण्याची जबाबदारी असते.

एक 'पितृलोक' देखील आहे, परंतु मृत्युनंतर सर्वजण पितृलोकामध्येच जातील—असा नियम नाही कारण आपापल्या कर्मांनुसार सर्वांना गती प्राप्त होत असते.

**प्रश्न**—जर एखाद्याचे माता-पिता (पितर) मुक्त झालेले असतील, भगवत् धामामध्ये गेले असतील तर त्यांच्या नावाने केलेल्या पिंडदानाचे काय होईल?

**उत्तर**—पुत्राला आपले पितर मुक्त झालेत की नाही याचा मुळीच पता नसतो. परंतु तो त्यांच्या नावाने आदरपूर्वक जे पिंडदान करतो, दान पुण्य करतो, ते सर्व त्याच्या नावावर जमा होते आणि मृत्युनंतर त्याला मिळते. ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तिला 'मुंबई' ला केलेली मनी-ऑर्डर ती व्यक्ति जर तेंथे नसेल तर ती मनीऑर्डर वापस येऊन पाठविणारालाच मिळते.

**प्रश्न**—'संतती' निर्माण केली नाही तरी देखील मनुष्य पितृऋणातून सुटू शकतो काय?

**उत्तर**—होय, त्याची पितृऋणामधून सुटका होऊ शकते. जो भगवंताला सर्वतोपरी शरण जातो त्याच्यावर कोणत्याही प्रकारचे ऋण राहत नाही—

**देवर्षिभूताप्तनृणां पितॄणां न किंकरो नायमृणी च राजन्।**
**सर्वात्मना यः शरणं शरण्यं गतो मुकुन्दं परिहृत्य कर्तम्॥**

(श्रीमद्भा० ११। ५। ४१)

हे राजन्! जो संपूर्ण कार्यांचा त्याग करून सर्वतोपरी शरणागतवत्सल भगवंताला शरण जातो तो देव, ऋषी, प्राणी, कुटुंबीय आणि पितृगण यापैकी कोणाचाही ऋणी आणि सेवक (गुलाम) राहत नाही.

**प्रश्न**—देवऋण म्हणजे काय? आणि त्यापासून सुटका होण्याचे उपाय कोणते आहेत?

**उत्तर**—पाऊस पडतो, उन्हाळ्यात उष्णता असते, हवा (वायु) वाहत असते; पृथ्वी सर्वांना धारण करते; रात्री चंद्र आणि दिवसा सूर्य सर्वांना प्रकाश देतो; त्यामुळे सर्वांच्या जीवन क्रिया सुरळीत चालत असतात—हे सर्व आपणावर असलेले देवऋण आहे. हवन, यज्ञ इत्यादी केल्यामुळे देवता पुष्ट होतात आणि आपण देवऋणातून मुक्त होतो.

**प्रश्न**—ऋषीऋण म्हणजे काय? आणि त्यापासून सुटका होण्याचे उपाय कोणते आहेत?

**उत्तर**—ऋषि-मुनिनी, संत-महात्म्यांनी जे ग्रंथ लिहून ठेवले आहेत, स्मृती ठेवल्या आहेत, त्यांच्यापासून आपणाला ज्ञानरूपी प्रकाश मिळतो; आपणाला शिक्षण मिळते, कर्तव्याकर्तव्याची जाणीव होते, त्यामुळे ऋषी, मुनी इत्यादीचे देखील आपणावर ऋण असते. त्यांनी लिहिलेले ग्रंथ वाचल्यामुळे, अध्ययन केल्यामुळे, त्यांचे पठण-पाठण केल्यामुळे, संध्या, गायत्री केल्यामुळे आपण ऋषी ऋणापासून मुक्त होतो.

**उत्तर**—गाय-म्हैस, शेळी-मेंढी, ऊंट-घोडा इत्यादी अनेक

प्रकारचे प्राणी आपल्या दैनंदिन जीवनात अनेक प्रकारची कामे करुन आपला उदर-निर्वाह करीत असतात. वृक्ष-वेलीपासून आपणाला फळे, फुले, पाने, लाकूड, औषधी इत्यादी मिळते. हे आपणावर दुसऱ्यांचे प्राण्यांचे ऋण आहे. पशुपक्ष्यांना गवत, अन्न, पाणी इत्यादी दिल्यामुळे, त्यांना पाणी घातल्यामुळे (वृक्षांना) तसेच वृक्षवेलीना खत-पाणी दिल्यामुळे आपण भूत-ऋणापासून मुक्त होतो.

**प्रश्न**—मनुष्यऋण म्हणजे काय? आणि त्यापासून सुटका होण्याचे उपाय कोणते आहेत?

**उत्तर**—मनुष्याने कोणाची तरी मदत घेतल्याशिवाय त्याचा जीवन-निर्वाह होणे कठीण आहे. आपण दुसऱ्यांनी बनविलेल्या रस्त्यावर चालतो; दुसऱ्यांनी खोदलेल्या विहिरीचे पाणी वापरतो. दुसऱ्यानी लावलेल्या वृक्षांना आपल्या उपयोगात आणतो. दुसऱ्यांनी उत्पन्न केलेले खाद्य पदार्थ इत्यादी आपल्या उपयोगात आणतो— हे त्यांचे आपणावर ऋण आहे. दुसऱ्यांच्या सुख-सुविधांसाठी विहीर खोदणे, पाणपोई लावणे, बगीचे तयार करणे, रस्ते बनविणे, धर्मशाळा बांधणे; अन्न-छत्र चालविणे इत्यादी उपायांनी आपण मनुष्य ऋणातून मुक्त होतो.

पितृऋण, देवऋण, ऋषिऋण भूतऋण आणि मनुष्यऋण—हे पांचही प्रकारचे ऋण 'गृहस्थाला' च लागू होतात. जो भगवंताला सर्वतोपरी शरण जातो तो सर्व प्रकारच्या ऋणापासून मुक्त होतो.

**प्रश्न**—जर आपणाला कोणत्याही प्रकारचे संतान नसेल तर आपल्या संबंधियांचे अथवा एखादे अनाथ बालक-बालिका दत्तक म्हणून घ्यावे काय?

**उत्तर**—आजकाल दत्तक न घेणे हेच योग्य आहे. कारण आपल्या पोटी जन्मलेला मुलगाच जर आपली सेवा करीत नाही तर दत्तक घेतलेला मुलगा आपले काय भले करणार? जरी

पिंडदान करण्यासाठी दत्तक घेण्याचे विधान केलेले आहे तरी दत्तक घेतलेला मुलगा पिंडदान करणार नाही तर दत्तक घेण्याचा काय फायदा? जर आपणाला मुलाची आवश्यकताच असती तर भगवंतांनी तो आपणाला दिलाही असता. आपल्याकरीता मुलांची गरजच नसेल म्हणूनच भगवंतानी आपणाला मुलगा दिला नसेल. म्हणून आपण विनाकारण दत्तक घेऊन स्वत:वर एक प्रकारचे संकटच का ओढवून घ्यावे? बहुधा असेच पहावयास मिळते की दत्तक घेतलेली मुले आपल्या आईवडिलांना दु:खच दु:ख देत असतात त्यांची सेवा तर करीतच नाहीत. म्हणून आपण मानवतेच्या दृष्टीकोनातून अनाथ बालकांच्या शिक्षणाची सोय करावी, त्यांची सेवा करावी; त्यांच्या उदर-निर्वाहाची व्यवस्था लावावी.

**प्रश्न**—जर आपणाला एकही मुलगा नसेल तर म्हातारपणी आपली सेवा कोण, करणार?

**उत्तर**—ज्यांना मुले असतात ते सर्वच आपल्या आईवडीलांची सेवा करतात काय? आजकालची मुले तर केवळ आपल्या आईवडीलांची धनसंपत्ती आपल्या नावाने करू इच्छितात; ते श्राद्ध-तर्पण, पिंडदान इत्यादी क्रियांना फालतू (अंधश्रद्धा) समजतात, अशी मुले आपल्या आईवडीलांची सेवा काय करणार? ते केवळ आपल्या आई-वडीलांना दु:खच देत असतात. वास्तविक दृष्ट्या आपल्या प्रारब्धामध्ये आपली जेवढी सेवा व्हायची असेल; जितके सुख मिळायचे असेल ते तर आपणाला मिळणारच; मग आपणाला पुत्र (संतान) असो अथवा नसो. आम्ही असे प्रत्यक्ष पाहिले आहे की एखाद्या विरक्त संताची जेवढी सेवा होते तेवढी सेवा 'गृहस्थाची' त्याची मुले करीत नाहीत. तात्पर्य असे आहे की मुले असतील तरच आपली सेवा होईल असे नाही.

**प्रश्न**—जर पुत्रसंतान नसेल तर मृत्युनंतर आपल्या नावाने

पिंडदान कोण करेल? आणि पिंडदान केल्या गेले नाही तर आपली गती काय होईल?

**उत्तर**—पिंडदान दिल्यामुळे ते स्विकारणाराचे जन्म-मरण सुरु राहते. ज्याप्रमाणे रस्त्याने चालणारा व्यक्ति भूक-तहान लागल्यामुळे एखाद्या ठिकाणी थांबतो आणि अन्न-पाणी मिळाल्यानंतर पुन्हा रस्त्याने चालावयास लागतो अशाप्रकारे मृतांना पिंडदान न मिळाल्यामुळे ते एका जागी अटकतात, थांबतात. आणि पिंडदान मिळाल्यानंतर ते त्या ठिकाणाहून चालावयास लागतात म्हणजेच त्यांची गती पुढे चालू होते; त्यांचे जन्म-मरण चालू (सुरू) होते; परंतु त्यांची मुक्ति अथवा कल्याण होत नाही.

वास्तविक दृष्ट्या मुक्ती होणे; कल्याण होणे हे यत्किंचित देखील संतानावर अवलंबून नाही. जर मुक्ती संतानावर अवलंबून असली तर मुक्ती 'पराधीन' झाली असती. तर मग मुक्ती प्राप्त करण्याविषयीचे स्वातंत्र्य मनुष्याला राहिलेच कोठे? कल्याणमार्गात मुक्तीच्या मार्गामध्ये जर शरीराविषयीची आसक्तीच बाधक आहे तर मृत्युनंतर देखील पुत्रापासून पिंडदान मिळविण्याची आशा कल्याण कसे होऊ देईल? ती आशा तर बंधनातच टाकेल, म्हणून जे आपले कल्याण इच्छितात त्यांनी पुत्रैषणा (पुत्राची इच्छा) लोकैषणा (जगामधील आदर-सत्कार आणि मान-प्रतिष्ठेची इच्छा) आणि वित्तैषणा (धनाची इच्छा) या तिन्हीही प्रकारच्या इच्छांचा त्याग करावयास पाहिजे. कारण हे तिन्हीही परमात्मप्राप्तीच्या मार्गातील अडथळे आहेत.

ज्यांना संतानाची, पिंडदान मिळण्याची इच्छा असते ते जन्म मरणाच्या चक्रात अडकून राहण्याची इच्छा करीत असतात. कारण जन्म झाला तरच तो पिंडदानाची इच्छा करेल , जर जन्मच होणार नाही तर पिंडदान पाहिजेच कुणाला?

पुत्र नसेल तर कल्याण होत नाही—ही धारणा (समजूत) साफ चुकीची आहे. जर संतानाच्या योगाने कल्याण झाले असते तर डुकरीणीला अकरा आणि सर्पिणीला एकशे आठ पिल्ले (संतान) असतात त्यांचे तर मग कल्याण व्हावयासच पाहिजे. या नियमानुसार जास्त मुले असणाराचे कल्याण शीघ्र व्हावयासच पाहिजे; परंतु तसे होत नाही.

संतान असो अथवा नसो मनुष्याने केवल भगवंताच्या चरणीच लीन व्हावयास पाहिजे, भगवत्-परायण होऊन भगवंताचे भजन करावयास पाहिजे. जर पुत्रप्राप्तीची इच्छा नष्ट होतच नसेल तर श्रीरामाला, श्रीकृष्णाला आपले पुत्र मानून पुत्राच्या भावनेने त्यांच्यावर प्रेम करावे. तो पुत्र (भगवंत) जशी सेवा करेल तशी सेवा आपल्या पोटी जन्मलेला मुलगा देखील करणार नाही. तो पुत्र तर लौकिक आणि पारलौकिक अशी दोन्हीही प्रकारची कामे करेल.

**प्रश्न**—गृहस्थाश्रमामध्ये मुलाबाळांचा उदरनिर्वाह विवाह इत्यादीच्या अनुषंगाने अनेक प्रकारच्या चिंता त्रास देत असतात. त्यांच्यापासून सुटका कशी केल्या जाऊ शकेल ?

**उत्तर**—कोणत्याही प्रकारचा प्राणी आपल्या प्रारब्धानुसारच जन्म घेत असतो. प्रारब्धामध्ये तीन गोष्टी असतात—जन्म, आयुष्यमर्यादा आणि भोग* या तीन गोष्टीमध्ये प्राण्याचा जन्म तर झालेला असतो; त्याची जेवढी आयुष्यमर्यादा असेल तितके दिवस तो जगणारच; आणि अनुकुल-प्रतिकुल परिस्थिती प्राप्त होणे याला 'भोग' असे म्हणतात. वास्तविक दृष्ट्या परिस्थिती कोणालाही सुखी अथवा दुःखी करीत नाही-उलट मनुष्यच अज्ञानाला वश होऊन परिस्थिती मुळे सुखी अथवा दुःखी होत असतो.

---

* सति मूले तद्विपाको जात्यायुर्भोगाः (योगदर्शन २। १३)

कन्या उपवर झाली असता तिच्या विवाहाबद्दल व्यर्थ चिंता करू नये; कारण ती आपले प्रारब्ध घेऊनच जन्माला आली आहे म्हणून तिला अनुकुल अथवा प्रतिकुल परिस्थिती प्रारब्धानुसार प्राप्त होणारच.माता-पित्यांनी तिच्या विवाहाविषयी 'ज्या ठिकाणी ती सुखी राहील त्या ठिकाणी तिला द्यायचे आहे' असा विचार मनात ठेवावा. परंतु आपण तिला सुखी घराण्यातच देऊ ही मातापित्याच्या अधीन असलेली गोष्ट नाही. म्हणून कर्तव्याचे पालन तर व्हावयास पाहिजे परंतु व्यर्थ चिंता मुळीच करू नये.

एक 'चिंता' असते आणि एक 'विचार' असतो. चिंता अज्ञानापासून (मूर्खपणामुळे) उत्पन्न होते त्यामुळे मनोमालिन्य प्राप्त होऊन विकास खुंटतो. परंतु विचारामुळे बुध्दीचा विकास होत असतो. म्हणून प्रत्येक काम विचारपूर्वक आणि नियोजनबद्ध रितीने करावयास पाहिजे. विचार करावा परंतु चिंता कधीही करू नये. चिंतारहित होऊन विचार केल्यास काहीना काही मार्ग (उपाय) जरूर मिळतो.

**प्रश्न**—जर वृध्दापकाळी मुले आपली सेवा करणार नाहीत तर काय करावयास पाहिजे. ?

**उत्तर**—पुत्राप्रति आपल्या मनात असलेली 'ममता' नष्ट करावी. असे मानावे की हे आपले 'पुत्र' नाहीतच. कोणत्याही प्रकारची सेवा न होणाऱ्या (सेवा न करणाऱ्या) कुटुंबियापासून सुख मिळावे अशी आशा आपल्या मनात असेल तर त्या 'आशेमुळेच' दुःखाची प्राप्ती होते—'**आशा हि परमं दुःखं नैराश्यं परमं सुखम्**' म्हणून आपल्या अंतःकरणात असलेल्या त्या 'आशेचा' त्याग करावयास पाहिजे.

आणि विपरित परिस्थितीमध्ये 'तपश्चर्या' करण्याची भावना ठेवावी. भगवंतानी कृपा करून आपणाला तपश्चर्या करण्याची संधी दिली आहे. अशी भावना मनात ठेवावी. जर कुटुंबियांनी आपली सेवा केली असती तर आपण त्यांच्या मोह-ममते-मध्ये

फसलो असतो परंतु भगवंतानी कृपा करून आपणाला फसू दिले नाही.

'मनुष्य मोह-ममते-मध्ये फसतो'—हाच त्याच्या अध्यात्मिक प्रगतीमधील फार मोठा अडथळा आहे. हा 'अडथळा' जे दूर करतात त्यांचे तर आपण उपकारच मानावयास पाहिजेत. ते आपले कल्याण करीत आहेत, आपणावर कृपा करीत आहेत असे मानावयास पाहिजे.

जीवनभर दुसऱ्यांवर विसंबून राहिल्यामुळे. (दुसऱ्यांची सेवा ग्रहण करीत राहिल्यामुळे), वृद्धापकाळी असमर्थतेमुळे कुटुंबियापासून सेवा मिळत रहावी अशी प्रबळ इच्छा राहत असते. म्हणून मनुष्याने सुरूवातीपासूनच असा सावधपणा बाळगावा की, मी 'सेवा ग्रहण करण्या-करीता जन्मलो नाही; उलट मी सर्वांची सेवा करण्याकरीता या ठिकाणी जन्म घेतला आहे; कारण मनुष्य, देवता, ऋषी-मुनी, पितर, पशु-पक्षी, परमेश्वर इत्यादींची सेवा करण्यासाठीच हे मनुष्य शरीर मिळालेले आहे. म्हणून कोणाकडूनही सुख-सुविधा प्राप्त व्हावी अशी इच्छा करू नये. जर आपण सुरूवातीपासूनच कोणाच्याही सेवेची अपेक्षा (इच्छा) ठेवणार नाही वृद्धापकाळी सेवा घडून आली नाही तरी आपणाला दुःख वाटणार नाही. होय; एक गोष्ट मात्र जरूर आहे, आपल्या मनात दुसऱ्यांची सेवा ग्रहण करण्याची इच्छा राहणार नाही तर दुसऱ्यांच्या मनात 'सेवा' करण्याची इच्छा जागृत होईल.

प्रत्येक क्षेत्रामध्ये त्यागाची आवश्यकता आहे. त्यागामुळे ताबडतोब शांती मिळते. प्रतिकुल परिस्थितीमध्ये देखील प्रसन्न राहणे हे फार मोठे 'तप' आहे. अंतःकरणाची शुध्दी तपामुळे होते, सुखोपभोगांमुळे होत नाही, सुखोपभोगांची इच्छा केल्यामुळे मन अशुध्द, अपवित्र होते; म्हणून मनुष्याने कधीही सुखाची

अपेक्षा न करता, आपल्या मन-वाणी आणि शरीर यांच्या योगाने दुसऱ्यांना सुखी करण्याची भावना ठेवावी.

**प्रश्न**—जर परिवारातील एखाद्या व्यक्तीचा मृत्यु झाला तर मृतात्म्याला शांती मिळण्याकरीता आणि आपल्या अंत:करणातील शोक दूर करण्याकरीता कोणता उपाय करावा ?

**उत्तर**—(१) मृतात्म्याकरीता विधिपूर्वक नारायणबली, श्राध्द-तर्पण इत्यादी कर्मे करावयास पाहिजेत. (२) जेंव्हा जेंव्हा मृत व्यक्तिची आठवण येईल तेंव्हा तेंव्हा त्याला भगवंताच्या चरणी लीन झालेले पहावे, (३) त्याच्या नावाने (निमिताने) गीता-पाठ, भागवत-सप्ताह, श्रीरामचरितमानसाचे नवान्हपारायण, नाम, जप, कीर्तन इत्यादी करावयास पाहिजे. (४) त्याच्या नावे गरीबांच्या मुलांना मिठाईचे वाटप करावे. (५) मिठाई मिळाल्यामुळे मुले प्रसन्न होतात त्यामुळे मृतात्म्याला आणि आपणाला देखील शांती मिळते.

सत्संग, कथा, कीर्तन, मंदिर, तीर्थक्षेत्रे इत्यादी ठिकाणी जाण्याविषयी शोक ठेवू नये; उलट त्या ठिकाणी अवश्य गेले पाहिजे. यापैकी देखील सत्संगाचे विशेष महात्म्य आहे; कारण सत्संगामुळे, सर्व प्रकारचा शोक दूर होतो.



# २. व्यवहार

**प्रश्न**—कुटुंबामधील जेष्ठ आणि वृद्ध व्यक्तीसोबत कसे वागावे?

**उत्तर**—कुटुंबामधील थोर, जेष्ठ, वृद्ध व्यक्तींना सुख, आराम देणे, त्यांची सेवा करणे, त्यांना मान देऊन, त्यांचा आदर करणे, त्यांची आज्ञापालन करणे, त्यांच्या अधिकाराखाली वागणे—हे कुटुंबामधील कनिष्ठ (लहान) व्यक्तींचे कर्तव्य आहे. परंतु कुटुंबातील जेष्ठ व्यक्तीनी अशी समजूत करून घेऊ नये की आम्ही जेष्ठ आहोत, पूज्यनीय आहोत, आदरणीय आहोत. कारण जेष्ठ व्यक्तींच्या मनात अशा भावना राहत असतील तर त्यांच्याप्रति दुसऱ्यांच्या मनात (अंत:करणात) असलेला आदरभाव कमी होऊन ते त्यांचा अनादर करावयास लागतात. म्हणून जेष्ठ व्यक्तीच्या मनात तर नेहमी सर्वांचे पालनपोषण करण्याविषयीची, कष्ट सहन करण्याविषयीची आणि लहान व्यक्तींना सुख-सुविधा देण्याची भावना असावी. जेष्ठ आणि कनिष्ठ व्यक्तीच्या 'हृदयात परस्पराबद्दल अशा प्रकारच्या भावना असतील तर सर्व कुटुंब आणि समाज सुखी होईल.

**प्रश्न**—विधवा स्त्रियासोबत सासू-सासरे, माता-पिता इत्यादीचे वर्तन (वागणूक) कसे असावे?

**उत्तर**—सून अथवा मुलगी विधवा झाल्यास सासू-सासरे; माता-पिता इत्यादिनीं मनापासून तिचा आदर करावा आणि बाह्य घटकापासून तिचे रक्षण करावे; तिची वर्तणूक बिघडून जाऊ नये म्हणून प्रसंगी तिला शासनही करावे, तात्पर्य असे आहे तिच्या हिताचे रक्षण करीत तिच्यासोबत असे वर्तन करावे की, ज्यामुळे ती दु:खीही होणार नाही आणि तिची वर्तणूक देखील बिघडणार नाही.

सून किवां मुलगी विधवा झाली तर सासू अथवा आईने तिचे जीवन साधेपणाने व्यतित होईल असे वातावरण तिच्याभोवती निर्माण करावे. त्यांनी स्वतः देखील दागीने-कपड़े, भोजनादिचे सेवन भोगबुद्धीने न करता निर्वाहबुद्धीने करावे. असे केल्यामुळे सुनेंचे अथवा मुलीचे वर्तन सुधारेल कारण सासू आणि आई ह्या स्वतः भोग भोगतील तर त्यांचे सुना आणि मुलींवर चांगले संस्कार पडणार नाहीत. जर सासू आणि आई संयमाने वागतील तर त्याचा सुना आणि मुलींवर चांगला परिणाम होऊन त्यांचे जीवन सुधारेल. सासू आणि आईने असा विचार करावा की जर या वयात आपण संयम ठेवू शकत नाही तर मग आपण संयम ठेवणार कधी? जगामध्ये संयमी आणि त्यागी व्यक्तीचेच महात्म्य वर्णन केल्या जाते; भोगी आणि संग्रही व्यक्तीचे गुणगाण करताना कोणीही आढळत नाही.

**प्रश्न**—विधवा स्त्री सोबत भाऊ आणि भावज यांचे वर्तन कसे असावे?

**उत्तर**—भाऊ आणि भावज यांनी विधवा स्त्रीचा मनापासून आदर करावयास पाहिजे. त्यांचा तिरस्कार (घृणा) मुळीच करू नये. त्यांचे चरित्र आणि त्यांच्या भावनांना आश्रय देऊन त्यांच्यासोबत आदरपूर्वक वर्तन करावयास पाहिजे. त्यांच्या कल्याणाच्या दृष्टीने त्यांच्यावर शासन आणि प्रेम करावे.

**प्रश्न**—माता-पित्यांनी कन्येच्या घरचे अन्न ग्रहण करावे काय?

**उत्तर**—माता-पित्याने कन्यादान केल्यानंतर 'तिकडच्या' घराची ती मालकीण बनते. त्यानंतर माता-पित्यांना तिच्या घरचे अन्न घेण्याचा अधिकार नाही. दान दिलेल्या वस्तुवर दात्यांचा अधिकार राहत नाही. याविषयी आम्ही एक गोष्ट ऐकली आहे. 'बरसाना' या नावाच्या गावाचा एक चांभार कांही कामाच्या निमित्ताने

नंदगावाला गेला. त्या ठिकाणी त्याला दुपारची वेळ झाली. त्याने कांहीही खाल्लेले नव्हते. त्याला तहान देखील लागली होती; परंतु कन्येच्या गावचे पाणी कसे काय पिणार ?* कारण आमच्या वृषभानुजींनी आपली कन्या या ठिकाणी दिलेली आहे—असा विचार करून त्याने त्या ठिकाणचे पाणी न पिताच बरसान्याला जाण्यासाठी तेथून प्रयाण केले. रस्त्याने चालत असतांना तहानेने व्याकुल झाल्यामुळे तो जमीनीवर पडला. त्यावेळी 'राधा' त्या चांभाराच्या कन्येचे रूप धारण करून त्याच्याजवळ आली आणि म्हणाली, "पिताजी, भी आपणासाठी पाणी आणले आहे, ते प्या. चांभार म्हणाला, 'सुकन्ये, मी सध्या नंदगांवाच्या हद्दीत आहे त्यामुळे येथील पाणी मी पिऊ शकत नाही. तेंव्हा 'राधा' म्हणाली, 'पिताजी, मी हे पाणी 'बरसान्या' वरून आणले आहे." त्या चांभाराने पाणी प्याले आणि म्हणाला, बेटी, आता तू जा; मी घरी येतोच. 'राधा' निघून गेली. चांभाराने घरी पोहचल्यानंतर आपल्या मुलीला मांडीवर घेऊन म्हटले, 'बेटी, तू पाणी पाजून माझा जीव वाचविला; जर तू पाणी घेऊन आली नसती तर माझा मृत्यु झाला असता. त्यावेळी त्याची कन्या म्हणाली, "मी तर पाणी घेऊन आलीच नव्हती. तेंव्हा चांभाराने जाणले की, "राधाच माझ्या कन्येचे रूप धारण करून मला पाणी पाजण्याकरीता आली होती. तात्पर्य असे आहे की पूर्वीचे लोक आपल्या कन्येच्या गावाचे देखील अन्न-पाणी ग्रहण करीत नसत.

जोपर्यंत आपली कन्या पुत्रवती होत नाही तोपर्यंत तिच्या घरचे अन्न-पाणी ग्रहण करू नये. परंतु कन्या पुत्रवती झाल्यानंतर माता-पिता तिच्या घरचे अन्न पाणी ग्रहण करू शकतात. कारण जावयांने

* बरसान्याचे लोक 'राधेला' आपली कन्या मानतात.

केवळ पितृऋणातून मुक्त होण्याकरीताच दुसऱ्याच्या कन्येचा स्विकार केलेला असतो. त्या कन्येला संतान झाल्यानंतर जांवई पितृऋणातून मुक्त होऊन जातो. आणि त्यामुळे कन्येवर आई-वडिलांचा अधिकार पोहचतो. नातू आपल्या आजा-आजी करीता श्राध्द तर्पण करतो; त्यांना पिंडदान देतो; आणि परलोकातील ते पितर देखील त्याचा स्विकार करतात. कन्येला पुत्रसंतान नसेल म्हणजे मुलगी असेल तरीही तिच्या घरचे अन्नपाणी ग्रहण करावयास हरकत नाही; कारण 'संतान' झाल्यामुळे कन्यादान सफल होते.

**प्रश्न**—माता-पिता आणि मुला-मुलींचे आपसातील वर्तन कसे असावे?

**उत्तर**—आई-वडिलांच्या मनात नेहमी असा भाव असावयास पाहिजे की, मुलामुलींनी आपल्या घरामध्ये जन्म घेतला आहे; म्हणून त्यांच्या इहलोक आणि परलोकांची सुधारणा आपणाला करावयाची आहे. आपणाला केवळ आपले सुख न पाहता त्यांची 'सुधारणा' कशी होईल ह्या भावनेत मुलामुलींना शिस्त लावावयाची आहे; त्यांच्यावर उत्तम संस्कार करावयाचे आहेत; वेळप्रसंगी त्यांच्या भल्यासाठी त्यांना शिक्षाही करावयाची आहे.

मुलामुलींच्या मनात अशी भावना असावयास पाहिजे की, ज्या शरीराच्या योगाने आपण परमात्मप्राप्ती करू शकतो, परमानंदाची प्राप्ती करू शकतो, ते शरीर आपणाला आई वडिलांकडून मिळालेले आहे. त्यामुळे आमच्याकडून आई-वडील कधीही दुःखी व्हावयास नकोत. आमच्यामुळे त्यांना अपयश यायला नको. आमची वर्तणूक अशी असावी की जिच्यामुळे समाजामध्ये आईवडिलांची मान-प्रतिष्ठा वाढेल. आपण तीर्थयात्रा, व्रते इत्यादी जी काही शुभ कर्मे करू त्यांचे फल (पुण्य) आई वडिलांनाच मिळावे. अशा भावना मुलामुलीच्या मनात असतील तर आपसातील स्नेह वृध्दींगत होईल;

वर्तमान काळात परिवार सुखी होऊन भविष्यकाळात सर्वांचे कल्याण होईल.

**प्रश्न**—पति आणि पत्नीची आपसातील वर्तणूक कशी असावी?

**उत्तर**—पतिच्या मनात अशी भावना नेहमी असावी की पत्नी आपल्या आई वडिलांना, भाऊ-बहिण इत्यादी सर्वांना सोडून आपल्याजवळ आली आहे. तर तीने हा किती मोठा त्याग केला आहे. म्हणून तिला कोणत्याही प्रकारचा त्रास होऊ नये, शरीर निर्वाहाकरीता तिला अन्न-पाणी, वस्त्रे, निवास इत्यादीची कोणत्याही प्रकारची उणीव पडू नये; माझ्यापेक्षा तिला जास्त प्रमाणात सुख मिळाले पाहिजे; अशी भावना पत्नीविषयी पतिने आपल्या मनात ठेवावी; त्याचबरोबर तिच्या पातिव्रत्य-धर्माकडेही लक्ष द्यावे, की ज्यामुळे तिचे वर्तन उच्छृंखल होणार नाही.

पत्नीच्या मनात अशी भावना नेहमी असावी की, मी आई-वडील, भाऊ-बहीण इत्यादी सर्व प्रकारच्या कटुंबियांचा त्याग करून पतिजवळ आली आहे; समुद्र ओलांडून मी आलेली आहे; आता किनाऱ्यावर पोहोचण्यापूर्वी मी बुडून जावयास नको.' म्हणजेच सर्वांचा त्याग करून जर मी पतिच्या घरी आलेली आहे तर आता माझ्यामुळे पतिच्या घरामधील कोणाचाही अपमान व्हावयास नको; कोणाचीही निंदा अथवा तिरस्कार व्हावयास नको. कारण असे करणे हे माझ्याकरीता फारच अनुचित होईल. मला कितीही त्रास झाला तरी चालेल परंतु इतरांना मात्र मुळीच त्रास होऊ नये. अशा प्रकारे आपल्या सुखाचा त्याग करून पतिच्या सुखाचाच विचार नेहमी करावा. त्यांचा 'लोक-परलोक' कसा सुधारेल—यांचाच विचार करावा.

**प्रश्न**—सासू आणि सुनेचे आपसातील वर्तन कसे असावे?

**उत्तर**—आपल्या सुनेविषयी सासूच्या मनांत अशी भावना नेहमी असावी की, माझी सून आपल्या आईला सोडून आमच्या घरी आलेली आहे; आणि ती तर माझ्या मुलाचेच एक 'अंग' आहे म्हणून माझी वर्तणूक नेहमी अशी असावी की, तिला (सुनेला) आपल्या आईची आठवण कधीही यावयास नको.

सुनेच्या मनात नेहमी अशी भावना असावी की. माझे जे सौभाग्य आहे त्या सौभाग्याची ही (सासू) जननी आहे; जे माझे सर्वस्व आहे, ते या वृक्षाचेच फळ आहे. म्हणून माझ्याकडून सासूचा नेहमी आदर, मानसन्मान व्हावयास पाहिजे; मी स्वतः कष्ट भोगून इतरांना सुख देण्याचा प्रयत्न करेन. त्यांनी माझ्या सोबत कितीही कठोर वर्तन केले तरी ते माझ्या हिताचेच आहे. व्यवहारामध्ये देखील आपणाला असे पहावयास मिळते की, सुनेच्या आजारपणात तिची सेवाशुश्रुषा जितकी सासू करते तितकी कोणीही करीत नाही. म्हणून माझ्या सोबत सासूचे वर्तन जेवढे हिताचे (कल्याण व्हावे या दृष्टीचे) आहे तेवढे इतर कोणाचेही नाही. आणि इतराचे असणे शक्यही नाही. सासूनी मला पुत्राची 'राणी' संबोधून आपला उत्तराधिकारी मलाच नेमले आहे. एवढा अधिकार दुसरा कोणीतरी देऊ शकतो काय? मी कितीतरी जन्मामध्ये या उपकाराची उतराई होऊ शकत नाही. त्यामुळे माझ्या कडून यांना कोणत्याही प्रकारचा त्रास मुळीच होऊ नये. अशा प्रकारे स्वतःच्या भावा-बहिणीपेक्षाही दीर-जावां इत्यादीचा अधिक आदर करावा. त्यांच्या सुखाचाच नेहमी विचार करावा. पतिचा जेष्ठ बंधू आणि त्याची पत्नी यांना आई-वडिलाप्रमाणे आणि दीर आणि त्याच्या पत्नीला मुला-मुलीप्रमाणे समजावे. आणि त्यांच्या सुखाचाच नेहमी विचार करावा. मी केवळ सर्वांची सेवा करण्याकरीताच या घरामध्ये आलेली आहे. त्यामुळे माझ्याकडून घडून येणारी लहान-

मोठी सर्व प्रकारची क्रिया केवळ त्यांच्या हिताकरीताच आणि सुखाकरीताच घडून यावयास पाहिजे. माझ्यासोबत त्यांचे वर्तन कसे आहे—याचा विचार मी मुळीच करणार नाही, कारण त्यांच्या कठोर वागणुकीमध्ये देखील माझे हितच सामावलेले आहे.

**प्रश्न**—दीर आणि भावजय यांचे आपसातील वर्तन कसे असावे ?

**उत्तर**—भावजयीने सीते प्रमाणे आणि दिराने भरताप्रमाणे वर्तन करावे. सीता भरताला आपल्या मुलाप्रमाणे समजत होती. कैकयीने रामाला विनाकारण वनात पाठविले, परंतु सीतेने याबद्दल भरताला कधीही दोष दिला नाही; भरताचा अनादर केला नाही. उलट चित्रकूट पर्वतावर भरताने जेंव्हा सीतेचे दर्शन घेतले तेंव्हा सीतेने त्याला आशीर्वादच दिला. अशा प्रकारे तरीही तिने त्याच्याविषयी आपल्या अंत:करणात असलेला मातृभाव कधीही सोडू नये; आणि दिराने सुध्दा आपल्या भावजयीचा आईप्रमाणे आदर करावा. जरी सीता वयाने फार मोठी नव्हती तरी देखील भरत, लक्ष्मण इत्यादीच्या मनात तिच्याविषयी मातृभाव होता.

**प्रश्न**—बायकोच्या भावासोबत आपले वर्तन कसे असावे ?

**उत्तर**—जशी आपणाला आपली पत्नी प्रिय असते तसाच आपल्या पत्नीचा भाऊ असल्यामुले तो देखील प्रेमास पात्र आहे. त्यांच्याकडून आपणाला वेळोवेळी कांही ना कांही मिळतच असते. म्हणून लौकिक दृष्टीने विचार केला तरी फायदाच फायदा आहे. पारमार्थिक भावामध्ये तर त्यागाची प्रधानता आहेच.

मेहुण्याच्या (बायकोच्या भावाच्या) मनात अशी भावना असावयास पाहिजे की, हे (बहिणीचा पती) माझ्या बहिणीचे पूज्यनीय दैवत आहे; म्हणून हे माझ्या आदरास पात्र आहेत. ज्याप्रमाणे बहिणीला अथवा मुलीला दान देण्याचे महात्म्य आहे त्याप्रमाणे बहिणीचे आराध्यदैवत असल्यामुळे मेहुण्याला (बहिणीच्या पतिला) देखील

दान देण्याचे महात्म्य आहे. ते प्रेमास आणि दानास पात्र आहेत; म्हणून परस्परांनी मनापासून आदर करीत राहिले पाहिजे.

**प्रश्न**—भाऊ आणि बहिण यांचे आपसातील वर्तन कसे असावे?

**उत्तर**—बहुधा चूक भावाकडूनच होत असते. बहिणीकडून चूक क्वचित प्रसंगीच घडून येते. म्हणून भावाच्या मनात बहिणीविषयी अशी भावना असावी की, माझी बहिण ही दयेची मूर्ती आहे. ब्राम्हण भोजन करविण्याचे जे पुण्य असते तेच पुण्य बहिण आणि मुलीला दान दिल्यामुळे मिळत असते.

आजकाल कायद्यान्वये वडिलांच्या संपतीमध्ये मुलाप्रमाणेच मुलीचाही वाटा आहे त्याच्या अनुषंगाने भावा-बहिणीमध्ये भांडण तंटे होऊ शकतात. जेंव्हा बहिण आपला 'वाटा' मागावयास लागते तेंव्हा भावाबहिणी—मधील प्रेम लयास जाते. आपापला हिस्सा मिळविण्यासाठी भावाभावामध्येच जर तक्रारी होतात तर भावा-बहिणीमध्ये तक्रारी होणे याचे मुळीच नवल नाही. म्हणून बहिणींनी आपल्या जुन्या परंपरांचा (वडिलच्या संपतीमध्ये वाटा न मागण्याचा) अंगिकार करावा; ही परंपरा धर्माला अनुसरून आणि शुध्द आहे. धनादी पदार्थ तर केवळ व्यवहाराच्याच उपयोगी पडतात त्यामुळे त्यांना विनाकारण जास्तीचे महत्त्व देण्यामध्ये कांहीच अर्थ नाही धनादी पदार्थापेक्षा प्रेमाला अधिक महत्त्व दिल्यामुळे व्यवहार सुरळीत होतील. धनादी पदार्थांचे महत्त्व वर्तमानकाळात कलह आणि परिणामी नरक-प्राप्ती करविणारे आहे. धनादी पदार्थांना महत्त्व देण्यामध्ये माणुसकी मुळीच नाही, दोन कुत्रे आपसामध्ये तो पर्यंतच प्रेमाने खेळतात की जोपर्यंत त्यांच्यासमोर भाकरीचा तुकडा येत नाही. भाकर दिसताच ते आपसात भांडावयास लागतात. जर मनुष्य देखील असेच आचरण करेल तर त्याच्या ठिकाणी कोणती माणुसकी राहिली?

धर्माला, आपल्या कर्तव्याला देव आणि ऋषी-मुनी यांच्या आज्ञेला आणि त्यागाला महत्त्व दिल्यामुळे इहलोक आणि परलोक हे दोन्हीही सुधारतात परंतु मानसन्मान, स्वार्थ इत्यादींना महत्त्व दिल्यामुळे ते दोन्हीही बिघडतात.

**प्रश्न**—गृहस्थाने अतिथीसोबत कसे वर्तन करावे ?

**उत्तर**—अतिथीचा अर्थ आहे—ज्याच्या येण्याची कोणतीही निश्चित तिथि अथवा वेळ नसते. अतिथीची सेवा करण्याची प्रामुख्यता गृहस्थाश्रमामध्येच असते. त्यानंतर अतिथीसेवेचा वानप्रस्थाश्रमामध्ये द्वितीय क्रमांक लागतो. ब्रम्हचर्याश्रम आणि संन्यासाश्रमामध्ये अतिथि सेवेला प्रामुख्यता दिलेली नाही.

जेंव्हा ब्रम्हचारी स्नातक बनतो म्हणजेच ब्रम्हचर्याश्रमातील नियमांचे पालन करून दुसऱ्या आश्रमात जाण्याची तयारी करतो तेंव्हा त्याला असा दीक्षान्त उपदेश दिला जातो—'**मातृदेवो भव! पितृदेवो भव! आचार्यदेवो भव! अतिथिदेवो भव!**' (तैत्तिरीयोपनिषद्, शिक्षा० ११ । २). म्हणजेच माता, पिता, आचार्य आणि अतिथी यांना परमेश्वर समजून त्यांची सेवा करा. गृहस्थाश्रमाचा, स्विकार करणाऱ्यांकरीता हा विशेष नियम आहे. म्हणून गृहस्थाश्रमी लोकांनी अतिथीचा योग्य प्रकारे आदर-सत्कार करावयास पाहिजे.

अतिथी सेवेमध्ये बसण्याकरीता आसन देणे, भोजन देणे, पिण्याकरीता पाणी देणे, इत्यादी अनेक प्रकारची सेवाकार्ये येतात. परंतु त्या सर्वामध्ये अन्न देणे हीच गोष्ट मुख्य आहे. जेंव्हा स्वयंपाक तयार होईल तेंव्हा विधिपूर्वक बलिवैश्वदेव करावा. बलिवैश्वदेव करण्याचा अर्थ आहे—संपूर्ण विश्वाला भोजन अर्पण करणे त्यानंतर भगवंताला नैवेद्य द्यावा. त्यानंतर जर कोणी अतिथि, भिक्षुक दाराशी आला तर त्याला भोजन द्यावे. भिक्षुकांचे सहा प्रकार सांगितलेले आहेत—

**ब्रह्मचारी यतिश्चैव विद्यार्थी गुरुपोषकः।**
**अध्वगः क्षीणवृत्तिश्च षडेते भिक्षुकाः स्मृताः॥**

"ब्रम्हचारी, साधू-संन्यासी, विद्याध्ययन करणारा, गुरूची सेवा करणारा, रस्त्याने जाणारा, आणि क्षीणवृत्ती असणारा (ज्याचे घर आग लागून भस्मसात झालेले आहे; चोर-डाकू इत्यादींनी ज्याच्या घरातील सर्व कांही चोरून नेलेले आहे आणि ज्याच्याजवळ उपजीविकेचे कोणत्याही प्रकारचे साधन नाही असा, इत्यादी) हे सहा प्रकारचे 'भिक्षुक' आहेत. म्हणून त्यांना भोजन द्यावे.

जर बलिवैश्वदेव करण्याच्या अगोदरच अतिथी, भिक्षुक आला तर? जर वेळ असेल तर बलिवैश्वदेव करावा नाही तर प्रथम भिक्षुकांना अन्न (भोजन) द्यावयास पाहिजे. ब्रम्हचारी आणि संन्यासी हे तर तयार झालेल्या स्वयंपाकाचेच हक्कदार आहेत. त्यांना भोजन देण्यापूर्वी आपण भोजन केले तर पाप लागते; या पापाची शुध्दी चांद्रायणव्रत* केल्यामुळे होते. अतिथि दारावरून विन्मुख परत गेला तर तो घरमालकाचे पुण्य घेऊन जातो; आणि आपले पाप देऊन जातो. म्हणून अतिथीला अवश्य भोजन द्यावयास पाहिज़े.

गृहस्थाने मनामध्ये तर अतिथीला परमेश्वराचे स्वरूप मानावयास पाहिजे त्याला अन्न-पाणी द्यावयास पाहिजे; परंतु बाहेरून सावधचित्ताने वर्तन करून त्याला आपल्या घराचा 'भेद' द्यावयास नको. तात्पर्य असे आहे की मनातून आदर करूनही अतिथीवर विश्वास ठेवू नये. कारण आजकाल अतिथीच्या वेषाने (रूपाने) कोण येईल याचा नेम नाही.

**प्रश्न**—गृहस्थाचा धर्म तर प्रथम संन्यासी इत्यादीना भोजन

---

* चांद्रायण व्रताची विधि अशा प्रकारे आहे—अमावस्येनंतर प्रतिपदेला एक घास, द्वितीयेला दोन घास—या क्रमाने एक-एक घास दररोज वाढवून पौर्णिमेला पंधरा घास ईतके अन्न ग्रहण करावे. नंतर पौर्णिमा झाल्यावर प्रतिपदेपासून दररोज

देण्याचा, आहे. आणि संन्याशाचा धर्म गृहस्थाचे भोजन झाल्यानंतर भिक्षेकरीता जाण्याचा आहे. ह्या दोन गोष्टी कशा?

**उत्तर**—गृहस्थाने स्वयंपाक तयार झाल्यानंतर प्रथम बलिवैश्वदेव करावा. त्यानंतर अतिथी आला तर शक्तीनुसार त्याला भोजन द्यावे. जर अतिथी आला नाही तर गाय दोहण्याकरीता जेवढा वेळ लागतो तितका वेळ दरवाज्याच्या बाहेर ऊभे राहून अतिथीची प्रतिक्षा करावी. अतिथी आला नाही तर त्याचा भाग (वाटा) अलग काढून ठेवून नंतर भोजन करावे.

संन्यासी कोणत्याही प्रकारचा संग्रह करीत नसतो; म्हणून त्याला जेंव्हा भूक लागेल तेंव्हाच त्याने भिक्षेकरीता गृहस्थाच्या दारावर यावे. जेंव्हा गृहस्थ भोजन करून भांडी-कुंडी धुऊन ठेवून देईल तेंव्हा अतिथीने भिक्षेकरीता जावे. तात्पर्य असे आहे की, गृहस्थावर देखील त्याचे ओझे पडणार नाही; त्याच्या घरातील स्वयंपाक ही कमी पडणार नाही. घरामध्ये जर केवळ एक, दोन व्यक्तिकरीताच स्वयंपाक बनविला असेल तर अतिथीच्या येण्यामुळे स्वयंपाक कमी पडेल. घरामध्ये जर पांच-सात व्यक्तिकरीता स्वयंपाक बनविला असेल तर अतिथी आल्यामुळे कांही फरक पडणार नाही; परंतु त्याच घरी जर जास्त (अनेक) भिक्षुक आले तर गृहस्थावर त्यांचा भार पडेल. म्हणून गृहस्थाचे भोजन झाल्यानंतरच संन्याशाने भिक्षेकरीता जावे आणि जे शिल्लक उरले असेल तेच घ्यावे. संन्याशाने भिक्षेकरीता जास्त वेळ दारावर थांबू नये. जर गृहस्थ भिक्षा वाढत नसेल तर एक गाय दोहण्याकरीता जेवढा वेळ

---

एक-एक घास कमी करून (म्हणजेच प्रतिपदेला चौदा, द्वितीयेला तेरा इत्यादी), अन्न ग्रहण करावे. तात्पर्य असे आहे की चंद्राच्या कला वाढतांना संख्या वाढवावी आणि कला घटताना घासांची संख्या कमी करणे याला 'चांद्रायण व्रत' असे म्हणतात. 'घासा' खेरीज इतर कोणत्याही प्रकारचे अन्न ग्रहण करू नये.

लागतो तेवढा वेळ दारावर थांबावे. जर गृहस्थाच्या मनात देण्याची भावना नसेल तर त्या ठिकाणाहून निघून जावे. मनांत राग आणू नये. त्याचप्रमाणे गृहस्थाने देखील संन्याशाविषयी राग (क्रोध) आणू नये.

**प्रश्न**—गृहस्थाने आपल्या शेजाऱ्या सोबत कसे वर्तन करावे?

**उत्तर**—गृहस्थाने शेजाऱ्याला आपल्या कुटुंबातील व्यक्तीच मानावे. हे आपले आहे; हे दुसऱ्यांचे आहे (आपपरभाव) असा भाव शूद्र मनाच्या लोकांमध्ये असतो. ज्याचे हृदय विशाल असणाऱ्याकरीता तर ही संपूर्ण पृथ्वीच 'कुटंब' आहे*. भगवंताच्या नात्याने (दृष्टीने विचार केला असता) तर सर्व आपले बांधवच आहेत. म्हणून घरामधील व्यक्ती-प्रमाणेच शेजाऱ्यासोबत वर्तन करावे. घरामध्ये एखाद्या वेळी खाऊ अथवा फळफळाव आणली तर, आणि आपल्या समोर शेजाऱ्यांची मुले असतील तर प्रथम त्या शेजाऱ्यांच्या मुलांना जास्त प्रमाणात आणि चांगल्या प्रकारची खाऊ (इत्यादी) द्यावी. त्यानंतर बहिणीच्या आणि मुलींच्या मुलांना अधिक प्रमाणात आणि चांगली मिठाई द्यावी. त्यानंतर कुटुंबातील जेष्ठ व्यक्तीच्या मुलांना मिठाई द्यावी आणि शेवटी उरलेली मिठाई आपल्या (स्वतःच्या) मुलांना द्यावी. यावर कोणी शंका घेईल की, आपल्या मुलांना साधारण आणि निकृष्ट प्रतीच्या वस्तु मिळाल्या तर आपणच तोट्यामध्ये राहिलो. ? परंतु यामध्ये तोटा मुळीच नाही. आपण शेजाऱ्यांच्या अथवा इतरांच्या मुलांसोबत जसे वर्तन करू तसेच वर्तन इतरही आपल्या मुलांसोबत करतील. महत्त्वाची गोष्ट अशी आहे आपसातील स्नेह

* अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम्।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम्॥

(पंचतन्त्र, अपरीक्षित० ३७)

विशेष प्रकारे वाढीस लागेल. प्रेमाची किंमत वस्तु-पदार्थांच्या किंमतीपेक्षा अधिक आहे.

शेजाऱ्यांची गाय, म्हैस आपल्या घरी आली तर शेजाऱ्यासोबत भांडण तंटा करू नये अथवा त्या प्राण्यांना देखील मारून हाकून देऊ नये; उलट प्रेमाने शेजाऱ्यांना सांगावे की; तुमच्या गाई, म्हशी आमच्या घरी आल्या होत्या. त्या पुन्हा येणार नाहीत याकडे लक्ष द्या.' अशा प्रकारचे वर्तन जर आम्ही शेजाऱ्यासोबत करू तर आपल्या बाबतीत ते देखील असेच वर्तन करतील. शेजारी जरी आपल्यासोबत क्रूरपणाची वर्तणूक करीत असतील तरीही आपण त्यांच्यावर राग आणू नये. परंतु आपणाकडून शेजाऱ्यांना कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही याची खबरदारी नेहमी घेतली पाहिजे.

आपल्या घरी एखादा उत्सव असेल, विवाहादी-सारखे मंगल कार्यक्रम असतील आणि त्या निमिताने जर आपण उत्तमोत्तम पक्वान्ने आपल्या घरी केली असतील तर ती पक्वान्ने आपल्या शेजाऱ्यांच्याही मुलांना द्यावीत कारण आपले शेजारी असल्यामुळे ते आपल्या परिवारामधील सदस्या प्रमाणेच आहेत. यापेक्षाही जास्त प्रेमाची वागणूक द्यायची असेल तर ज्याप्रमाणे आपण आपल्या बहिणीच्या अथवा मुलींच्या लग्नामध्ये आंदण देतो तसेच आंदण शेजाऱ्यांच्या मुलींनाही द्यावे. जसे आपण आपल्या जावयासोबत वागतो तसेच त्यांच्याही जावयासोबत वागावे.

**प्रश्न**—नोकरांना कोणत्या प्रकारची वागणूक द्यावी ?

**उत्तर**—नोकरावर पुत्रवत प्रेम करावे. नोकर दोन प्रकारचे असतात—(१) काही नोकरांना पगार (पैसे) आणि जेवण दिल्या जाते; (२) कांही नोकरांना केवळ पगार दिल्या जातो आणि जेवण ते स्वतःच्या घरी करतात. जे नोकर पगार आणि जेवणाच्या कराराने नेमलेले असतात त्यांच्या भोजनाच्या बाबतीत विषमता

करू नये. अनेक घरामध्ये असे दिसून येते की, नोकरांना तृतीय श्रेणीचे, परिवारामधील इतर सदस्यांना द्वितीय श्रेणीचे आणि आपल्या पति-पुत्रांना प्रथम श्रेणीचे भोजन देतात. तर स्त्रियांनी घरामध्ये असे तीन प्रकारचे भोजन (स्वयंपाक) न बनविता केवळ 'एकाच' प्रकारचा स्वयंपाक करावा. स्वयंपाक मध्यम दर्जाचा बनवून सर्वांना द्यावयास पाहिजे. ऐन वेळेवर एखादा भिक्षुक आला तर त्याला देखील भोजन द्यावयास पाहिजे.

जो नोकर केवळ पगार घेतो, (आपल्या घरी भोजन करीत नाही) तो त्याच्या घरी जसे योग्य वाटेल तसे भोजन घेईल. परंतु आपल्या घरी जेंव्हा विशेष प्रसंगी पक्वान्ने अथवा मिठाई केल्या जाईल तेंव्हा त्या नोकराला सुद्धा त्याच्या घरी देखील ती पक्वान्ने आणि मिठाई द्यावी. विवाहादी प्रसंगामध्ये नोकराला देखील कपडे वस्तु द्याव्यात. त्याला बक्षिसे, कपडे, मिठाई, इत्यादी पदार्थ-(वस्तु) द्यावेत. पगार जास्त देण्यापेक्षा इतर वस्तु इनाम बक्षिस वगैरे दिल्याचा अधिक चांगला प्रभाव पडतो. (होतो). नोकरांना इनाम, बक्षिसे इत्यादी दिल्यामुळे देणाऱ्याचे अंतःकरण उदार बनून आपसातील प्रेम वाढीस लागेल; त्यामुळे नोकर वेळोवेळी आपले चोर-डाकू इत्यादीपासून संरक्षण करेल; विवाहादी प्रसंगी मोठ्या उत्साहाने काम करेल.

**प्रश्न**—घरामध्ये राहत असलेल्या उंदीर, घूस, पाली, झुरळे, डास, ढेकूण इत्यादी प्राण्यासोबत कोणत्या प्रकारचे वर्तन करावे ?

**उत्तर**—घरामध्ये राहणाऱ्या या प्राण्यांना देखील आपल्या कुटुंबामधील सदस्य मानावे. कारण ते देखील स्वतःचे घर तयार करून आपल्या घरामध्ये राहत असतात. त्यामुळे त्यांना देखील आपल्या घरामध्ये राहण्याचा अधिकार आहे. तात्पर्य असे आहे की स्वतःचे रक्षण करीत शक्यतोवर त्यांचे देखील पालन करावयास पाहिजे. आजकाल त्यांना मारून टाकले जाते. त्यांना मारणे हे योग्य नाही.

मनुष्याला स्वत:चे रक्षण करण्याचाच अधिकार आहे; इतरांना मारण्याचा अधिकार नाही. ज्याप्रमाणे पृथ्वीवर मनुष्य आपले घर करून राहतो त्याप्रमाणे उंदरासारखे प्राणी देखील आपले घर करून राहतात; त्यांना मारून टाकू नये. घरामध्ये जर साप, विंचू यासारखे विषारी प्राणी राहत असतील तर त्यांना युक्तीने पकडून घरापासून दूर आणि सुरक्षित ठिकाणी सोडून द्यावे.

घरामध्ये केरकचरा साचल्यामुळे; घराची व परिसराची स्वच्छता योग्य प्रकारे न ठेवल्यामुळे च डास ढेकूण इत्यादी प्राणी उत्पन्न होतात. त्यामुळे घरच स्वच्छ ठेवले तर ते प्राणी घरामध्ये उत्पन्नच होणार नाहीत. स्वच्छता ठेवूनही जर ते उत्पन्न झालेच तर त्यांना मारण्याचा आम्हाला मुळीच अधिकार नाही.

**प्रश्न**—घरामध्ये कुत्रा पाळावा काय?

**उत्तर**—घरामध्ये कुत्रा मुळीच पाळू नये; कारण कुत्र्याचे पालन करणारा नरकगामी होत असतो. महाभारतामध्ये वर्णन आलेले आहे की, जेंव्हा द्रौपदीसहित पांचही पांडव वीर संन्यास घेऊन उत्तरे कडे जात होते तेंव्हा भीमादी चारही बंधुनी देहत्याग केला. जेंव्हा युधिष्ठिरांचाही देहत्याग होण्याची वेळ आली तेंव्हा इंद्राच्या आज्ञेवरून त्यांचा सारथी,—मातली,—रथ घेऊन युधिष्ठिराजवळ आला आणि त्यांना म्हणाला की, "आपण सशरीर स्वर्गामध्ये चला" त्यावेळी युधिष्ठिराने पाहिले की एक कुत्रा त्यांच्याजवळ ऊभा आहे. त्यांनी सांगितले की, "हा कुत्रा मला शरण आलेला असल्यामुळे माझ्या सोबत तो देखील स्वर्गामध्ये येईल." यावर इंद्र युधिष्ठिराला म्हणाला—

**स्वर्गे लोके श्ववतां नास्ति धिष्ण्यमिष्टापूर्तं क्रोधवशा हरन्ति।**
**ततो विचार्य क्रियतां धर्मराज त्यज श्वानं नात्र नृशंसमस्ति॥**

(महाभारत, महाप्र० ३।१०)

'हे धर्मराजा, कुत्रा पाळणाऱ्याला स्वर्गामध्ये स्थान नाही. त्यांचे यज्ञ करणे, विहीर, बारव इत्यादी बनविण्याचे जे पुण्य असते ते क्रोधवश या नांवाचे राक्षस हरण करतात. म्हणून विचारपूर्वक निर्णय घेऊन या कुत्र्याला सोडून द्या'. असे करण्यामध्ये कोणत्याही प्रकारची निर्दयता नाही.''

युधिष्ठिरांनी म्हटले, 'मी या कुत्र्याचे पालन केलेले नाही. हा तर मला शरण आलेला आहे. मी त्याला आपले अर्धे-पुण्य देत आहे; त्यामुळे तो देखील माझ्यासोबतच येईल.' युधिष्ठिरांनी असे म्हटल्याबरोबर त्या कुत्र्यामधून धर्मराज (यम) प्रगट झाले आणि म्हणाले ''मी तुमची परीक्षा पाहिली आहे,'' तुम्ही माझ्यावर विजय मिळविला आहे; आता आपण स्वर्गात चलावे.

तात्पर्य असे आहे की गृहस्थाने देखील आपल्या घरामध्ये कुत्रा पाळू नये. महाभारतामध्ये वर्णन आलेले आहे—

**भिन्नभाण्डं च खट्वां च कुक्कुटं शुनकं तथा।**
**अप्रशस्तानि सर्वाणि यश्च वृक्षो गृहेरुहः॥**
**भिन्नभाण्डे कलिं प्राहुः खट्वायां तु धनक्षयः।**
**कुक्कुटे शुनके चैव हविर्नाश्नन्ति देवताः।**
**वृक्षमूले ध्रुवं सत्त्वं तस्माद् वृक्षं न रोपयेत्॥**

(महाभारत, अनु० १२७। १५-१६)

''घरामध्ये फुटलेले भांडे, मोडकी खाट; कोंबडया (कोंबडे,) कुत्रा आणि पिंपळासारखे वृक्ष असणे हे 'चांगले' मानले नाही. फुटक्या भांड्यामध्ये कलियुगाचा वास असतो. मोडक्या खाटेमुळे धनाची हानी होते. कोंबडे, कुत्रे इत्यादी प्राण्यामुळे देवता त्या घरातील यज्ञद्रव्य ग्रहण (स्विकार) करीत नाहीत. तसेच घरामध्ये एखादे मोठ्या आकाराचे झाड (वृक्ष) असेल तर त्याच्या पायथ्याजवळ सांप, विंचू इत्यादी विषारी प्राणी राहतात. म्हणून

घरामध्ये कोणत्याही प्रकारचे (आकाराने) मोठे होणारे झाड लावू नये.

कुत्रा हा प्राणी अत्यंत अशुद्ध आणि अपवित्र असतो त्याच्या अन्नग्रहण पद्धतीमुळे, स्पर्शामुळे, जागजागी बसल्यामुळे घरातील व्यक्तिच्या अन्न-पाण्यामध्ये, आचरण प्रकारामध्ये, अशुद्धी आणि अपवित्रता येत असते. आणि अपवित्रतेचे फळ देखील अपवित्रच असते.

**प्रश्न**—शेत इत्यादीच्या रक्षणाकरीता (राखण्याकरीता) कुत्रा पाळला तर काय नुकसान होईल ?

**उत्तर**—कुत्रा केवळ शेताची राखण करण्याकरीताच पाळा. वेळोवेळी त्याला खायला प्यायला द्या. परंतु त्याला आपल्यापासून दूरच ठेवा; त्याला नेहमी आपल्या सोबतच ठेवणे, त्याला सोबत घेऊन फिरावयास जाणे, त्याला नेहमी नेहमी. स्पर्श करणे इत्यादी गोष्टी निषिद्ध मानल्या गेल्या आहेत. तात्पर्य असे आहे की, कुत्रा पाळून त्याचे रक्षण करणे हा दोष नाही. उलट प्राणीमात्राचे पालन करणे हे गृहस्थाश्रमी व्यक्तीचे विशेष कर्तव्य आहे. परंतु कुत्र्यासोबतच मिळून-मिसळून राहणे, त्याला नेहमी आपल्या सोबतच ठेवणे, त्याच्या विषयी मनात आसक्ती ठेवणे, हे पतनाचे कारण आहे. कारण जर अंतकाळी कुत्र्याची आठवण आली तर पुढचा जन्म कुत्र्याचाच घ्यावा लागेल.*

---

* यं यं वापि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम्।
तं तमेवैति कौन्तेय सदा तद्भावभावितः॥
(गीता ८। ६)

''हे कुन्तीपुत्र अर्जुना! मनुष्य मृत्युसमयी ज्या-ज्या भावनांचे स्मरण करीत आपला देहत्याग करतो; त्या भावनांनी नेहमी प्रभावित होऊन त्याच भावनांना प्राप्त होत असतो. म्हणजेच त्या-त्या योनींना प्राप्त होत असतो''.

**प्रश्न**—घराच्या छतावर अथवा भिंतीवर पिंपळ उगवला तर तो उपटून टाकावा की नाही?

**उत्तर**—अशा ठिकाणी उगवलेला पिंपळ काळजीपूर्वक उपटून एखाद्या चौकामध्ये, मंदिरासमोर, किंवा गल्लीमध्ये चांगल्या ठिकाणी लावावा; आणि त्याला पाणी देण्याची व्यवस्था करावी. छप्पर अथवा भिंत पाडावयाचे काम पडले तरीही कांही हरकत नाही; नंतर त्यांची पुन्हा दुरूस्ती करावी; परंतु शक्यतोवर पिंपळ तोडून टाकू नये. पिंपळ, वड, उंबर, आवळा, तुळस इत्यादी पवित्र वृक्षांचा विशेष आदर करावा हे वृक्ष मनुष्याला देखील पवित्र (पावन) बनविणारी आहेत.

**प्रश्न**—गृहस्थाने उदर-निर्वाहाकरीता धन-द्रव्य इत्यादी, कोणत्या प्रकारांनी मिळवावे?

**उत्तर**—गृहस्थाने शारीरिक परिश्रम करून आणि दुसऱ्यांचे अधिकार हिरावून घेतल्या जाणार नाहीत असा सावधपणा ठेवून धन-द्रव्य मिळवावयास पाहिजे. जेवढे धन मिळविल्या जाईल त्यापैकी दहावा, पंधरावा अथवा विसावा भाग दान-पुण्य इत्यादी कर्मांकरीता (कामाकरीता) काढून वेगळा ठेवावा. धन-द्रव्य मिळविताना कोणत्या ना कोणत्या तरी प्रकारचे दोष घडतच असतात; त्या दोषाबद्दल प्रायश्चित म्हणून कमाविलेल्या धनाचा काही भाग वेगळा काढावा.

**प्रश्न**—आजकाल सरकारी कायदेच असे आहेत की आपण सन्मार्गाने धन कमवू (मिळवू) शकत नाही. त्यामुळे आपण काय करावे?

**उत्तर**—सरकारी कायद्यापासून वाचण्याचा उपाय आहे—आपला खर्च कमी करणे, जिभेचे चोचले न पुरविणे; फालतू शौक न करणे, सजावटी वरील खर्च कमी करणे, साधारण पद्धतीने

जीवन जगणे, अत्यंत पवित्र आणि सात्विक रितीने जीवन व्यतित करावे. कारण धन मिळविणे ही आपल्या हातातली गोष्ट नाही. धन तर जितके मिळायचे असेल तितकेच मिळणार; परंतु खर्च कमी करणे, ही आपल्या अधीन असलेली गोष्ट आहे; असे करण्यामध्ये आपण स्वतंत्र आहोत.

**प्रश्न**—ही गोष्ट तर प्रत्यक्ष आहे की जर आपण सरकारी कर पूर्णपणे भरला तर आपल्याजवळील धन निघून जाते; आणि जर धन लपवून ठेवले तर ते शिल्लक (तसेच) राहते; तेंव्हा धन लपवणे हेच योग्य आहे?

**उत्तर**—एक वेळ असे दिसते की करबुडवेपणामुळे धन कायम राहिले परंतु शेवटपर्यंत ते धन मुळीच राहणार नाही.* लपवून ठेवलेले धन उपयोगातही आणता येणार नाहीं. परंतु ते मिळविण्यासाठी जो खोटेपणा, अन्याय, कपट, धोकेबाजी इत्यादी ज्या गैरमार्गांचा अवलंब केलेला आहे त्याबद्दल शिक्षा (दंड) तर भोगावीच लागेल. आणि अन्यायाच्या मार्गाने मिळविलेले धन सोडून देऊन मरावे लागेल. तात्पर्य असे आहे की, अन्यायाच्या मार्गाने मिळविलेले धनद्रव्य डॉक्टर, वकिलांकडे जाईल, चोर त्याला चोरून नेतील, आणि बँकेमध्ये ठेवून दिले (पडून राहिले) तर उपयोगी देखील पडणार नाही. म्हणून जे धन आपल्या उपयोगीच पडणार नाही त्याकरीता पाप, अन्याय का करावयाचा?

"सन्मार्गाने कमाई केली असता धन कमी प्रमाणात मिळेल" असा कांही नियम नाही. जितके धन आपल्या नशिबात आहे

---

* अन्यायोपार्जितं द्रव्यं दशवर्षाणि तिष्ठति।
प्राप्ते चैकादशे वर्षे समूलं तद्विनश्यति॥

"अन्यायाच्या मार्गाने मिळविलेले धनद्रव्य दहा वर्षापर्यंत स्थिर राहते आणि अकरावे वर्ष सुरू होताक्षणीच संपूर्णपणे (मूळासहित) नष्ट होते".

तितके तर आपणाला मिळणारच. ते कोणत्या प्रकारे प्राप्त होईल याचा आपणाला मुळीच पत्ता लागणार नाही परंतु 'येणारे' धन नक्कीच मिळेल. (जरूर येईल) अशी कित्येक उदाहरणे पहावयास मिळतात की, जे लोक धनाचा त्याग करतात, त्यांना देखील धनप्राप्ती होते. तात्पर्य असे आहे की, ज्याप्रमाणे तोटा, रोगराई, दुःख इत्यादीची इच्छा न करता देखील; किंवा कोणत्याही प्रकारचे प्रयत्न न करता देखील आपोआपच प्राप्त होत असतात. त्याप्रमाणे, जे धन आणि सुख आपल्या नशिबात आहे त्याची इच्छा अथवा प्रयत्न न करता देखील ते आपणाला प्राप्त होणारच.

**सुखमैन्द्रियकं राजन् स्वर्गे नरक एव च।**
**देहिनां यद् यथा दुःखं तस्मान्नेच्छेत तद् बुधः॥**

(श्रीमद्भा० ११। ८। १)

"हे राजा, प्राण्यांना ज्याप्रमाणे इच्छा न करता देखील प्रारब्धानुरूप दुःखे प्राप्त होत असतात त्याप्रमाणे इंद्रियजन्य सुखे स्वर्गामध्ये आणि नरकामध्ये देखील प्राप्त होत असतात. म्हणून बुद्धीवान मनुष्याने कधीही त्या इंद्रियजन्य सुखांची इच्छा करू नये.



# ३. बालकांविषयी माहिती

**प्रश्न**—आदर्श संतान उत्पत्ती कशी होईल?

**उत्तर**—जर आईवडिलांचे आचरण, भावना पवित्र (आदर्श) असतील आणि केवळ पितृऋणातून मुक्त होण्याकरीताच जर ते संतान उत्पत्ती करीत असतील तरच आदर्श संतान उत्पन्न होऊ शकते; आपणाला सुख मिळावे हा दृष्टीकोन असेल तर आदर्श संतान उत्पत्ती होणार नाही. कारण सुख आणि आसक्तीचा दृष्टीकोन मनात ठेवून निर्माण केलेली संतती कमी श्रेष्ठ असते. कुंतीचे आचरण आणि भावना इतक्या श्रेष्ठ होत्या की स्वतः धर्मराज (यम) त्यांच्या उदरी जन्माला आले.

माता जेंव्हा गर्भवती असेल तेंव्हा तिने आपल्या संततीला श्रेष्ठ, उत्तम बनविण्याच्या उद्देशाने भगवंताच्या कथा आणि भगवत्‌भक्तांची चरित्रे ऐकावीत त्यांचेच चिंतन करावे; तशीच दृश्ये (चित्रे) पहावीत; अशा प्रकारे आईवर पडलेल्या सत्संगतीच्या परिणामामुळे उत्तम संतान उत्पन्न होईल. ज्याप्रमाणे भक्त प्रल्हादाची आई गर्भवती होती तेंव्हा नारदाने गर्भातील बालकाला उद्देशून तिला भगवंताचे चरित्र ऐकविले, उपदेश दिला, की ज्यामुळे राक्षसकुळात जन्म घेऊन देखील 'प्रल्हाद' एक श्रेष्ठ भक्त होऊन गेले.

सत्कर्म (सदाचार) सत्‌चिंतन, सत्‌चर्चा, आणि सत्संग या चार गोष्टी अत्यंत मननीय आहेत. चांगली कामे करणे याला 'सत्कर्म' असे म्हणतात; दुसऱ्यांच्या कल्याणाचे आणि भगवंताचे चिंतन करणे याला 'सत्‌चिंतन' असे म्हणतात. आपसामध्ये भगवंतांच्या आणि भक्तांच्या चरित्राचे वर्णन आणि कथन करणे, आणि ऐकणे याला 'सत्‌चर्चा' असे म्हणतात. मी भगवंताचा आहे आणि भगवंत माझे आहेत—अशा प्रकारे निश्चयात्मक बुद्धीने

भगवत्स्वरूपामध्ये स्थिर राहणे याला 'सत्संग' असे म्हणतात. या चार गोष्टीमुळे संतान आदर्श आणि श्रेष्ठ बनत असते.

नवनिर्मिती करण्याचे स्वातंत्र्य मनुष्यालाच आहे. आपली उन्नती (प्रगती) करण्याचेही स्वातंत्र्य मनुष्यालाच आहे; मनुष्यच स्वतःला श्रेष्ठ बनवू शकतो; याकरीता मनुष्याने संत-महात्म्यांची संगत करावी. संत—महात्मे मिळत नसतील तर परमेश्वराच्या साधनेमध्ये तत्परतेने रममाण झालेंल्या साधकांची संगत करावी. किंवा साधकही भेटणे अवघड असेल तर गीता, रामायण, इत्यादी शास्त्रांचे पठण—पाठण आणि मनन-चिंतन करावे; आपल्या हिताचा दृष्टीकोन नेहमी आपल्या समोर ठेवावा; असे केल्याने मनुष्य श्रेष्ठ पुरूष बनू शकतो.

**प्रश्न**—आईवडिलांचे आचरण, भावना इत्यादी अत्यंत श्रेष्ठ असून देखील त्यांची मुले.' चांगली' असत नाहीं—याचे कारण काय आहे?

**उत्तर**—याचे मुख्य कारण असे आहे की,—बालकांना योग्य प्रकारची 'संगत' प्राप्त होत नाही. ऋणानुबंधाच्या योगाने, पूर्वीच्या जन्मातील बदला घेण्यासाठी देखील अशा प्रकारची संतती उत्पन्न होत असते. जो मुलगा कुसंगतीमुळे बिघडतो तो सत्संगतीमुळे सुधरू' शकतो; परंतु ज्याने पूर्वीच्या जन्मातील बदला घेण्यासाठी आपल्या उदरी जन्म घेतला आहे तो तर आपणाला दुःखच देणारा असतो. म्हणून आपले आचरण, श्रेष्ठ, भावना उत्तम असून देखील जर आपल्या उदरी कुसंतान उत्पन्न झाले तर त्याला पूर्वजन्मीचा ऋणानुबंध समजून प्रसन्न रहावे आणि आपले 'ऋण' कमी कमी होत आहे अशा प्रकारची भावना मनात ठेवावी.

'विश्रवा'चा जन्म ब्राह्मण कुळात झाला होता. परंतु त्यांची पत्नी कैकसी चा जन्म राक्षस कुळामध्ये झाला होता; त्यामुळेच

तिच्या उदरी रावणाचा जन्म झाला. उग्रसेन हे एक धर्मात्मा पुरुष होते परंतु एके दिवशी एका राक्षसाने उग्रसेनाचे रूप धारण करून त्याच्या पत्नी सोबत सहवास केल्यामुळे कंसाचा जन्म झाला.

**प्रश्न**—दुराचारी माता-पित्याच्या उदरी चांगली संतती उत्पन्न होते याचे कारण काय आहे?

**उत्तर**—बहुधा आईवडिलांचे गुणधर्म त्याच्या संततीमध्ये संक्रमीत होतात. ऋणानुबंधामुळे, अथवा गर्भधारणेच्या वेळी सत्संगती प्राप्त झाल्यामुळे, चांगला संस्कार पडल्यामुळे, अथवा गर्भावस्थेमध्ये एखाद्या संत-महात्म्याची संगती प्राप्त झाली तर श्रेष्ठ संतती उत्पन्न होते. उदा हिरण्यकश्यपूच्या कुळामध्ये प्रल्हादाचा जन्म झाला. प्रल्हादा-विषयी अशी माहिती मिळते की, तपश्चर्येमध्ये विघ्न उत्पन्न झाले असता हिरण्यकश्यपू आपल्या पत्नीला भेटण्याकरीता घरी गेला असता गर्भाधानाच्या वेळी गप्पा गोष्टी करीत असतांना त्याच्या तोंडून कित्येक वेळा 'विष्णु' च्या नामाचे उच्चारण झाले. जेंव्हा त्याची पत्नी कयाधू ही गर्भवती होती तेंव्हा गर्भातील मुलाला उद्देशून नारदाने तिला 'भक्तिविषयक' गोष्टी ऐकविल्या; त्यामुळे प्रल्हादाच्या अंतःकरणात भक्तिचेच संस्कार पडले. ज्याप्रमाणे पाण्याचा स्वाद मधुर असतो परंतु जमीनीच्या संगतीमुळे त्याचा स्वाद बदलून जातो. (प्रत्येक विहिरीच्या पाण्याचा स्वाद वेगवेगळा असतो). त्याप्रमाणे संगतीमुळे मनुष्याच्या अंतःकरणातील भाव बदलतात.

**प्रश्न**—पित्याचाच आत्मा पुत्राच्या रूपाने पुन्हा प्रगट होतो—याचे तात्पर्य काय आहे?

**उत्तर**—ज्याप्रमाणे कोणी ब्राम्हणाला आपला कुलगुरू मानतो कोणी यज्ञोपवित प्रदान करणाऱ्याला आपला गुरू मानतो; परंतु अशा गुरूचा मृत्यु झाल्यानंतर त्यांच्या पुत्रांना गुरू मानल्या जाते;

आणि गुरूचा ज्याप्रमाणे आदर सत्कार केल्या जात होता तसाच आदर सत्कार त्यांच्या पुत्राचा देखील केल्या जातो.* ज्याप्रमाणे वडिलाच्या निधनांनंतर त्यांच्या संपत्तीचा वारसा त्याच्या मुलाकडे आपोआपच जातो. त्याप्रमाणे पुत्राचा जन्म होताच तो आपल्या वडिलांचा प्रतिनिधी बनतो. पित्याच्या जागी बसून घराचा कारभार पाहणारा होतो.'

या ठिकाणी 'आत्मा' या शब्दाचा अर्थ 'गौणात्मा' असा आहे. म्हणजेच 'आत्मा' हा शब्द 'शरीरवाचक' आहे. शरीरापासून शरीर (पुत्र) उत्पन्न होते. म्हणून व्यवहारामध्ये पुत्र हा पित्याचा प्रतिनिधी होत असतो; परंतु परमार्थामध्ये पुत्राचा कोणत्याही प्रकारचा वाटा नाही.

**प्रश्न**—मुलांना 'श्रेष्ठ' बनविण्यासाठी त्यांना कोणत्या प्रकारचे शिक्षण द्यावे?

**उत्तर**—लहान मुले आजूबाजूच्या परिसराचे निरीक्षण करून बरेच कांही शिकत असतात; त्यामुळे आई-वडिलांनी त्यांच्यासमोर चांगले आचरण करावे, आपले जीवन संयमी आणि पवित्र ठेवावे; आईवडिलाचे श्रेष्ठ आचरण पाहून मुलेही 'श्रेष्ठ' बनतील.

बालकांच्या प्रगतीसाठी सर्वप्रथम माता-पित्यांनी आपले आचरण चांगले ठेवावे आणि नंतर त्यांना चांगल्या चांगल्या गोष्टी सांगाव्यात. उच्च प्रतीचे शिक्षण द्यावे; भक्तांची आणि भगवंताची चरित्रे ऐकवावीत, व्यवहार करीत असतांना बालक परमार्थ साधण्याची

* जेंव्हा अर्जुन अश्वत्थाम्याला बांधून द्रौपदीसमोर आणतात तेंव्हा द्रौपदी अश्वत्थाम्याला सोडून देण्याचा आग्रह करीत म्हणते-की ज्यांच्या कृपेने आपणाला संपूर्ण शस्त्रास्त्रांचे ज्ञान प्राप्त झाले आहे—ते आपले आचार्य द्रोणाचार्यच पुत्राच्या (अश्वत्थामाच्या) रूपाने आपल्या समोर उभे आहेत—'स एष भगवान् द्रोणः प्रजारूपेण वर्तते' (श्रीमद्भा १।७।४५)

कला शिकत असेल तर त्या शिक्षणाला चांगले शिक्षण असे म्हणतात. याविषयी फारच थोडी उदाहरणे सांगितली जातात.

माता-पिता कोठे बाहेर जाण्याची इच्छा करतात तेंव्हा ते मुलांना सांगतात की "तुम्ही येथेच रहा" असे म्हटल्यामुळे मुले न ऐकता उलट हट्ट धरतात. आणि त्यामुळे आई-वडिलांना देखील अडथळा होतो. मुले देखील दुःखी होतात आणि घरात अशांती पसरते. म्हणून मुलांना सुरूवातीपासूनच असे सांगावयास पाहिजे की, आम्ही कोठे निघालो तर हट्ट करू नये, आम्ही सांगू तसे करा. दररोज दोन तीन वेळा असे सांगितले तर मुले ही गोष्ट मानावयास लागतात. त्यानंतर कोठे जातेवेळी मुलांना सांगावे की, हट्ट करू नका, आम्ही सांगतो तसे ऐका, तर ते आपले म्हणणे ऐकतील.

घरामध्ये मिठाई, फळे, चांगले पदार्थ आणत असतात, त्यावेळी मुळे ते घेण्यासाठी हट्ट करतात. म्हणून ज्यावेळी खाद्य पदार्थ समोर दिसत नसतील त्यावेळी दिवसातून दोन तीन वेळा मुलांना सांगावे की, एखादी खाण्याची वस्तु आणली असेल तर प्रथम दुसऱ्यांना द्यावी, नंतर शिल्लक राहिलेली आपण खावी. नंतर जर एखादी उत्तम खाद्य वस्तु समोर आली तर त्यांना सांगावे की, "बघा, मुलानो, हट्ट करू नका, प्रथम दुसऱ्यांना खाऊ घाला आणि नंतर आपण खा—"वाटून खावे, वैकुंठास जावे". त्यामुळे मुले हट्ट करणार नाहीत. अशा प्रकारे आपण मुलांना ज्या ज्या गोष्टी शिकवू इच्छिता त्या गोष्टी दिवसातून दोन तीन वेळा मुलांना सांगाव्यात आणि त्या गोष्टींचा त्यांच्याकडून प्रेमपूर्वक स्विकार करवून घ्यावा.

मुलांना चांगल्या चांगल्या गोष्टी शिकवाव्यात उदाहरणार्थ— हे पहा मुलांनो, कधीही कोणत्याही वस्तुची चोरी करू नये, आपल्या आईला ती वस्तु मागून घ्यावी देत नसेल तर रडून ती

वस्तु मिळवावी परंतु चोरी करू नये. लहान भावा-बहिणीवर प्रेम करा; त्यांच्यासोबत खेळा, त्यांना आनंदाने खाऊ घाला. ज्याप्रमाणे भगवान श्रीराम आपल्या लहान भावावर प्रेम करीत होते; प्रेमाने त्यांना समजावित होते त्याप्रमाणे तुम्ही देखील आपल्या धाकट्या बांधवासोबत प्रेमाने वागा, त्यांच्यासोबत भांडणतंटे करू नका. आपसामध्ये भांडण्याचा प्रसंग निर्माण होत असेल तर दुसऱ्यांचे ऐका, आपली गोष्ट (म्हणणे) इतरांनी मानावी असा हट्ट करू नका. आईवडिलांच्या आज्ञेप्रमाणे व मार्ग दर्शनाप्रमाणे घरातील कामे करा. वेळ व्यर्थ कामामध्ये खर्च करू नका; चांगली कामे करण्यात नेहमी दंग रहा. दुसऱ्यांचा अधिकार हिरावून घेऊ नका, दुसऱ्यांच्या वस्तुंना आपले समजू नका; आपल्या-जवळील वस्तु चांगल्या कामामध्ये लावा. इत्यादी.'' अशा प्रकारे ज्या चांगल्या गोष्टी शिकवायच्या असतील त्या लहान मुलांना दिवसातून कमीतकमी दोन वेळा सांगावयास पाहिजेत. त्यांच्या अंतःकरणावर या गोष्टीविषयी प्रेम' उत्पन्न होईल.

तात्पर्य असे आहे की, बालकासमोर चांगले वर्तन करून दाखवावे आणि दुसरी गोष्ट अशी आहे की त्यांना चांगले शिक्षण द्यावयास पाहिजे. या विषयी मातापित्यांनी भगवंताच्या ह्या वचनांचे (विधानांचे) मनन करावयास पाहिजे.

**न मे पार्थास्ति कर्तव्यं त्रिषु लोकेषु किंचन।**
**नानवाप्तमवाप्तव्यं वर्त एव च कर्मणि॥**
**यदि ह्यहं न वर्तेयं जातु कर्मण्यतन्द्रितः।**
**मम वर्त्मानुवर्तन्ते मनुष्याः पार्थ सर्वशः॥**
**उत्सीदेयुरिमे लोका न कुर्यां कर्म चेदहम्।**
**संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः॥**

(गीता ३। २२—२४)

***अर्थ***—"हे पार्था, मला ह्या-तिन्ही लोकामध्ये कोणत्याही प्रकारचे कर्तव्य नाही; तसेच कोणतीही प्राप्त करण्यायोग्य वस्तु अप्राप्त नव्हे; तरी देखील मी कर्तव्यकर्मा-मध्येच रममाण झालेला असतो. जर मी एखाद्या क्षणी सावध होऊन कर्तव्यकर्म करणार नाही तर फार नुकसान होईल. कारण मनुष्ये सर्व प्रकारे माझेच अनुकरण करीत असतात. जर मी कर्मे करणार नाही तर ही सर्व मनुष्ये नष्ट भ्रष्ट होऊन जातील. आणि मी संकर उत्पन्न करणारा आणि या संपूर्ण प्रजेला नष्ट करणारा होईन".

**प्रश्न**—आजकाल शालेय वातावरण चांगले राहिलेले नाही. म्हणून मुलांना उत्तम प्रकारचे शिक्षण देण्याकरीता काय करावयास पाहिजे ?

**उत्तर**—मुलांना दररोज घरीच शिक्षण द्यावयास पाहिजे. त्यांना अशा गोष्टी, कथा ऐकवाव्यात की, ज्या गोष्टी मध्ये अशी माहिती असेल की, ज्यांनी आईवडिलांच्या मतानुसार वर्तन केले त्यांची प्रगती झाली आणि ज्यांनी आईवडिलांच्या मतानुसार वर्तन केले नाही त्यांचे जीवन धुळीस मिळाले. जेंव्हा मुले पुस्तके वाचावयास लागतील तेंव्हा त्यांना भक्तांची चरित्रे वाचावयास द्यावीत. मुलांना असा उपदेश करावा की, 'प्रत्येक (इतर) मुलासोबत स्वतंत्र संबंध प्रस्थापित करू नकोस; त्यांच्यामध्ये जास्त-वेळ रमू नकोस. शाळा सुटताच ताबडतोब आपल्या घरी ये. मोठ्या (श्रेष्ठ) व्यक्तीसोबत रहा. काही खायची इच्छा झाली तर पदार्थ आपल्या आईला तयार करून मागा व नंतरच खा. बाजारात विकावयास आलेल्या तयार वस्तु खाऊ नका, कारण केवळ पैसा कमविणे एवढाच दुकानदाराचा उद्देश असतो. त्यामुळे तो चांगले पदार्थ तयार करीत नाही. लहान मुलांची पचनशक्ती चांगली असल्यामुळे त्यांना बाजारातील

'तयार' पदार्थ खाल्ल्यानंतर पचतील देखील. परंतु त्यांचा वाईट परिणाम नंतर कळून येईल.

गृहस्थाने धन-संपत्ती मिळविण्यापेक्षा मुलांचे चारित्र्य आणि शील यांच्या संगोपना कडे आणि संवर्धनाकडे जास्त लक्ष द्यावे. कारण आपण मिळवून ठेवलेल्या धनाचा उपभोग आपली मुलेच घेणार आहेत. जर मुळे दुर्व्यसनी, दुर्वर्तनी असतील तर धन-संपतीच्या योगाने ती अधिकच अधोगतीला जातील. या संदर्भात सत्पुरुषांचे म्हणणे असे आहे की—***"पूत सपूत तो क्यों धन संचै? पूत कपूत तो क्यों धन संचै?"*** म्हणजेच मुलगा '**सुपुत्र**' असेल तर त्याच्याजवळ धनसंपतीची मुळीच कमी राहणार नाही. आणि मुलगा '**कुपुत्र**' असेल तर कमावून ठेवलेले सर्व धन नष्ट करून टाकेल. तर मग धनाचा संचय करायचाच कशासाठी?

**प्रश्न**—मुलांना 'इंग्रजी शाळेत' शिक्षण द्यावयास पाहिजे की नाही.?

**उत्तर**—मुलांना इंग्रजी शाळेत शिक्षण दिले तर ते आपल्या घरी राहून देखील 'ख्रिस्ती' बनतील. म्हणजेच आपलीच मुले वरून 'हिंदू' आणि आतून 'ख्रिस्ती' अशी बनतील. ही मोठी दुःखाची गोष्ट (लाजेची गोष्ट) आहे की हजारो मैल दूर राहणारे या ठिकाणी येऊन आपल्या मुलांना ख्रिस्ती बनवितात आणि आपण आपल्या घरच्या मुलांना देखील हिन्दु बनवू शकत नाही. मुलांना राष्ट्राची संपती असे म्हणतात त्यामुळे त्यांचे रक्षण करावे.

श्रेष्ठ, थोर व्यक्तींनी स्वतःची शाळा महाविद्यालये उघडावी; त्या विद्यालयामध्ये योग्य प्रशासन आणि उत्तम संस्कारयुक्त शिक्षण मुलांना द्यावे. शिकविणाऱ्या शिक्षकांचे आचरण (वागणूक) देखील उत्तम असावयास पाहिजे. जरी सद्‌वर्तनी शिक्षक मिळणे

कठीण आहे तरी प्रयत्न केल्यास सद्‌गुणी शिक्षक मिळू शकतील. तसेच शाळा महाविद्यालयामधून आपल्या धर्माचे तसेच गीता रामायणादी ग्रंथाचे शिक्षण देखील द्यावे. 'धार्मिक शिक्षणा' करीता दररोज एक तालिका अनिवार्य असावी.

आपली राहणी साधी असावी आणि मुलांना देखील साधे आणि टापटीपीने रहावयास सांगावे. शौक, ऐष, आराम इत्यादीचा त्याग करावा. आणि नेहमी चांगलीच कामे करीत रहावे, त्यामुळे त्याचा मुलांवर देखील चांगला परिणाम होईल. घरामध्ये देवाचे मंदिर असावे; परमेश्वराची पूजा दररोज करावी, भगवंताच्या चरणामृताचे सर्वांनी सेवन करावे. घरामध्ये भगवत्‌चर्चा, भगवंताच्या नांवाचेच कीर्तन करावे, भक्तीगीतांचे गायन व्हावे; आपण जेवढे चांगले व्हाल तेवढी मुलेही चांगली होतील. बोलल्यापेक्षा प्रत्यक्ष कृतीचा विशेष परिणाम होत असतो.

**प्रश्न**—मुलामुलींच्या लग्नाकरीता आईवडिलांनी काय करावयास पाहिजे. ?

**उत्तर**—सर्वात महत्त्वाची गोष्ट अशी की मुलामुलींचे जसे 'प्रारब्ध' असेल तसेच होईल. परंतु आईवडिलांचे कर्तव्य असे आहे की; मुलाचे लग्न करतेवेळी (भावी सुनेचा) स्वभाव पहावयास पाहिजे; कारण जन्मभर मुलीसोबतच निभाव करावा लागेल. मुलीला एखादा भयंकर रोग नसावा; तिच्या आईचा स्वभाव चांगला असावा. इत्यादी जितकी चौकशी मुलीविषयी करता येईल तेवढी करावी. जर मुलीचा विवाह करावयाचा असेल तर 'घर' चांगले पहावे, 'वर' देखील सुलक्षणी पहावा. त्याची योग्यता, पात्रता इत्यादी गोष्टी पारखूनच आपली मुलगी त्याला द्यावयास पाहिजे. शास्त्रामध्ये 'वर' परिक्षेविषयी खालील प्रमाणे सात गोष्टी सांगितल्या आहेत.

**कुलं च शीलं च वपुर्यशश्च विद्यां च वित्तं च सनाथतां च।**
**एतान्गुणान्सप्त परीक्ष्य देया कन्या बुधैः शेषमचिन्तनीयम्॥**

***अर्थ***—वराचे कुळ, शील, शरीरसंपती, यश, विद्या, धनसंपती आणि सनाथता (श्रेष्ठ लोकांचा आधार)—या सात प्रकारच्या गुणांची परीक्षा करूनच आपली कन्या त्याला द्यावयास पाहिजे.

ज्या घरामध्ये 'वर' आणि त्याची आई 'चांगली' (सद्वर्तनी) असेल त्याच घरामध्ये 'कन्या' सुखाने राहू शकते. कन्येला अगदी 'जवळ' आणि फार दूर देखील देऊ नये. जवळ दिल्यामुळे जास्त प्रमाणात वितंडवाद उत्पन्न होत असतात* आणि अत्यंत दूर दिली तर आईवडिलांशी तिची भेट होणे कठीण होते.

तात्पर्य असे आहे की, आपली संतती सुखी राहील, तिला सतत सुख मिळत राहील, तिला कोणत्याही प्रकारचे दुःख होणार नाही, आणि संततीचा वंश वृद्धींगत होईल—अशा भावनेने आपल्या संततीचा विवाह करावा.

**प्रश्न**—हुंडा घेणे पाप आहे काय?

**उत्तर**—होय; हुंडा घेणे हे पाप आहे.

**प्रश्न**—जर पाप आहे तर शास्त्रामध्ये या विषयीचे विधान कां आलेले आहे?

**उत्तर**—शास्त्रामध्ये केवळ हुंडा 'देण्याविषयीचे' विधान आलेले आहे हुंडा घेण्याविषयीचे विधान आलेले नाही. हुंडा

---

* मुलगी जवळ दिली तर ती आपले प्रत्येक प्रकारचे दुःख आपल्या आईजवळ सांगत बसेल. आणि त्यामुळे तिची आई तिच्या सासू-सासऱ्यांच्या घरामध्ये विघ्ने उत्पन्न करील. मुलीने देखील आपल्या दुःखाविषयीची गोष्ट कोणाजवळही न सांगता ती आपल्या घरामध्येच गुप्त ठेवावी. नाही तर तिच्यावरच संकटे येऊन तिचीच बेइज्जती होईल आणि ज्या ठिकाणी तिला रात्रं-दिवस रहायचे आहे त्या ठिकाणी (घरी) अशांती पसरेल.

आपण मागू नये. हुंडा न मागण्याविषयीचेच महात्म्य शास्त्रामध्ये आलेले आहे. हुंडा देणे हे आपल्या हाती आहे; परंतु हुंडा घेणे ही आपल्या हातची गोष्ट नाही.

अभिलाषा दोन प्रकारची असते—(१) आमची वस्तु आम्हाला मिळावी—ही अभिलषा न्याय्य आहे. परंतु परमात्मप्राप्तीमध्ये ही अभिलाषा देखील बाधक आहे.

(२) दुसऱ्यांची वस्तु आम्हाला मिळावी ही अभिलाषा नरकामध्ये घेऊन जाणारी आहे. अशा प्रकारे हुंडा 'घेण्या—विषयीची जी इच्छा आहे ती इच्छा (अभिलाषा) नरकामध्ये नेणारी आहे'. मनुष्यशरीराची प्राप्ती होऊन देखील घोर नरकामध्ये जाणे हे केवढे अधःपतन आहे. म्हणून मनुष्याने कमीतकमी दारूण नरकामध्ये घेऊन जाणाऱ्या इच्छेचा—दुसऱ्याचे धन आपणाला प्राप्त व्हावे या अभिलाषेचा—त्यागच करावयास पाहिजे.

वास्तविक दृष्ट्या धन-संपती ही प्रारब्धानुसारच प्राप्त होत असते. जर इच्छा केल्याने धन मिळाले तर कोणीही निर्धन राहिले नसते. कोणाचीही 'धनाची इच्छा' कधीही पूर्ण झालेली नाही, होत नाही आणि होणार ही नाही त्यामुळे त्या इच्छेचा तर त्यागच करावा लागेल. धन जर मिळायचेच असेल त्याची इच्छा 'न करता' ते सुगमतेने मिळेल; आणि इच्छा 'केल्यास' ते कठिणतेने, पापाने आणि अन्यायपूर्वकच मिळेल. गीतेमध्ये अर्जुनाने विचारले आहे की, 'मनुष्य इच्छा न करता देखील पाप' का करतो?' यावर भगवान् श्रीकृष्णांनी उतर दिले की, ''कामना हीच संपूर्ण पापाचे मूळ आहे.'' (३।३७—३९).

पूर्वीच्या काळी मुलाच्या सासरवाडी कडून आंदणाच्या अथवा हुंड्याच्या स्वरूपाने आलेले धन घरी न आणता ते बाहेरच

वाटून दिल्या जात असे, ते धन आपल्या घरामध्ये ठेवत नव्हते. आणि दुसऱ्यांची कन्या दानाच्या रूपाने स्विकारली आहे या करीता प्रायश्चित म्हणून यज्ञ, दान, ब्राह्मणभोजन इत्यादी क्रियाकर्मे करीत असत. कारण दुसऱ्याची कन्या दानाच्या रूपाने स्विकारणे हे देखील एक प्रकारचे फार मोठे ऋण (कर्ज) आहे. परंतु गृहस्थाश्रमामध्ये दुसऱ्याची कन्या स्विकारावीच लागते. म्हणून त्यांच्या मनात अशी भावना राहत असते की जर आमच्या घरी कन्या असतील तर आम्हीही कन्यादान करू.

जो ब्राम्हण विधिपूर्वक गाय इत्यादीचे दान स्विकारतो तो देखील स्वतःकरीता प्रायश्चित रूपाने यज्ञ, गायत्री जप इत्यादी करतात—असे आम्ही पाहिले आहे. दुसऱ्याचे धन ग्रहण करणे, (घेणे) हा जर दोष असेल तर हुंड्यादाखल विवाहप्रसंगी धन घेणे हा देखील दोषच आहे. जर एखाद्या ठिकाणी हुंड्यादाखल काही घेणे अपरिहार्य असेल तर केवळ देणाऱ्याच्या इच्छापूर्तिकरीता, त्याच्या प्रसन्नतेकरीताच घ्यावयास पाहिजे. आपल्या मनात थोडीशी देखील देण्याची इच्छा नसेल आणि केवळ देणाऱ्याच्या प्रसन्नतेकरीताच थोडेशे धन घेतले तर ते 'घेणे' देखील 'देण्या' प्रमाणेच (समानच) आहे.



# ४. "मुलांचे कर्तव्य"

## "गीता-दर्पण" मधून—

**माता च कमला देवी पिता देवो जनार्दनः।**
**बान्धवा विष्णुभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम्॥**

वास्तविक दृष्ट्या खऱ्या अर्थाने लक्ष्मी-नारायण हेच सर्वांचे माता-पिता आहेत, त्यामुळे या दृश्य जगातील आपले जे आई-वडील, आहेत ते साक्षात् लक्ष्मी-नारायणाचीच स्वरूपे आहेत. म्हणून त्यांची अविरतपणे सेवा करीत राहणे हे पुत्राचे परमकर्तव्य आहे, आई-वडीलापासून उत्पन्न झालेले हे शरीर आपले न मानता माता पित्याचेच मानतात तेच खरे 'पुत्र' आहेत, स्थूल, सूक्ष्म अथवा कारण यापैकी कोणत्याही प्रकारचे शरीर का असेना त्यावर ते (पुत्र) आपल्या आई-वडीलांचाच अधिकार मानतात. श्रीमनुने म्हटले आहे की, पुत्र जे कांही तीर्थ, व्रत, भजन, स्मरण इत्यादी प्रकारची शुभाशुभ कर्मे करतो ती त्याने आपल्या मातापित्यानांच अर्पण करावीत* आई-वडील जीवंत असेपर्यंत त्यांची तत्परतेने सेवा करावी. त्यांचे मन नेहमी प्रसन्न व आनंदी राहील अशीच वर्तणुक करावी. मृत्युनंतर त्यांच्या नावाने पिंडदान द्यावे, श्राद्ध-तर्पण करावे. त्यांच्याकरीता तीर्थ, व्रत इत्यादी शुभ-कर्मांचे आचरण करावे. असे केल्यांने पितरांचा आशीर्वाद प्राप्त होऊन पुत्राचे इहलोकात आणि परलोकातही कल्याण होते.

श्रीभीष्माचार्यांनी आपल्या पित्याच्या सुखा-करीता वैयक्तिक

---

* तेषामनुपरोधेन पारत्र्यं यद्यदाचरेत्।
तत्तन्निवेदयेत्तेभ्यो मनोवचनकर्मभिः॥

(मनुस्मृति २। २३६)

सुखाला तिलांजली देवून मरेपर्यंत ब्रह्मचर्याचे पालन करण्याची प्रतिज्ञा केली. त्यांनी कनक आणि कामिनी या दोन्हीचाही त्याग केला. त्यामुळे प्रसन्न होऊन त्यांच्या वडीलांनी त्यांना इच्छामृत्युचे वरदान दिले. हे सामर्थ्य त्यांनां केवल पित्याची सेवा केल्यामुळेच प्राप्त झाले.

श्रीरामचंद्रानी पित्याच्या आज्ञेचे पालन करण्याकरीता राज्य, वैभव, सुख, आराम इत्यादींचा त्याग केला. वाल्मीकी रामायणामध्ये असे वर्णन आढळते की, श्रीरामचंद्रानी स्वतः असे म्हटले आहे की—पित्याच्या इच्छेखातर-आज्ञेखातर-मी विषाचे देखील भक्षण करू शकतो अग्नीकाष्ठात आणि भयानक समुद्रामध्ये देखील प्रवेश करु शकतो परंतु पित्याची आज्ञा मोडू शकत नाही* श्रीरामचंद्र पित्याची आज्ञापालन करीत होते, अर्थात् वडीलानीं कोणत्या प्रकारची आज्ञा केली, कोणत्या स्थळी, काळी केली, कोणत्या अवस्थेमध्ये आणि कोणत्या परिस्थितीमध्ये केली, इत्यादींचा काहीही विचार न करता ते वनवासामध्ये गेले त्यामुळे आईवडीलांची आज्ञापालन करणाऱ्यांसाठी श्रीराम 'आदर्श' बनले. श्रीगोस्वामी तुलसीदासजीनीं म्हटले आहे—

**अनुचित उचित बिचारु तजि जे पालहिं पितु बैन।**
**ते भाजन सुख सुजस के बसहिं अमरपति ऐन॥**

तात्पर्य असे आहे की, प्रत्येक पुत्राने श्रीरामचंद्राप्रमाणे आपले आचरण आदर्श बनवावयास पाहिजे—आणि, असा विचार करावयास पाहिजे की या परिस्थितीमध्ये जर श्रीराम माझ्या ठिकाणी असते तर त्यांनी कोणत्या प्रकारचे वर्तन केले

---

* अहं हि वचनाद् राज्ञः पतेयमपि पावके।
भक्षयेयं विषं तीक्ष्णं पतेयमपि चार्णवे॥

(वाल्मीकी अयोध्या १८। २८-२९)

असते ? अशा प्रकारचे स्मरण निरंतर ठेवून आपली दैनंदिन कर्मे करावीत.

मुलांनी आईवडीलांची कितीही सेवा केली तरी ते त्यांचे ऋण फेडू शकत नाहीत. कारण ज्या मनुष्य शरीराच्या योगाने आपले कल्याण होऊ शकते, जीवन्मुक्ती मिळू शकते, भगवंता-विषयी प्रेम-उत्पन्न होऊ शकते, भगवंताचा मुकुटमणी बनू-एवढ्या उच्चपदाची प्राप्ती होऊ शकते, ते मनुष्यशरीर आपणाला मातापित्याने दिलेले आहे. त्यांचे हे एवढे मोठे ऋण कोणताही पुत्र फेडू शकत नाही.

**प्रश्न**—माता-पित्याच्या सेवेचे तात्पर्य काय आहे ?

**उत्तर**—माता-पित्याच्या सेवेचे तात्पर्य कृतज्ञतेमध्ये आहे. आई-वडीलांनी मुलांकरीता जे कष्ट घेतलेले असतात त्यांचे ऋण पुत्रावर असते. पुत्र त्या ऋणाची कधीही उतराई होऊ शकत नाही: आईने मुलाची जेवढी सेवाशुश्रुषा केली असेल तेवढी मुलगा करू शकत नाही. जर एखादा पुत्र असे म्हणेल की, मी माझ्या कातडीची पादत्राणे करून आईला परिधान करावयास देतो तर आम्ही त्याला विचारू की ही कातडी तुम्ही कोठून आणली आहे ? ही कातडी देखील आईनेच दिलेली आहे. त्याच कातडीची पादत्राणे आईला परिधान करावयास दिली तर त्यामध्ये नवल ते कोणतें ? केवळ देण्याचा अभिमानच उराशी बाळगला आहे. त्याचप्रमाणे हे शरीर पित्याचा देखील अंश आहे. पित्याच्या परिश्रमा-मुळेच पुत्र शिकून सवरून योग्यतेला पात्र होत असतो. त्याला अन्न-पाणी, कपडे इत्यादी गोष्टी मिळत असतात. पित्याचे हे ऋण देखील कसे काय फेडल्या जाऊ शकते, त्यामुळे केवळ मातापित्याची सेवा केल्याने, त्यांचे मन प्रसन्न ठेवल्याने त्यांचे ऋण फेडल्या जाऊ शकत नाही तर ते केवळ माफ होऊ शकते.

**प्रश्न**—माझा पुत्र असा व्हावा त्याचे कल्याण व्हावे या उद्देशाने आई-वडीलानीं संग थोडाच केला आहे. त्यांनी तर केवळ आपल्या वासनातृप्तीकरीता संग केला आहे. आणि त्यामधून आमचा जन्म झाला तर मग आई वडीलांचे आमच्यावर ऋण कसे काय आहे?

**उत्तर**—केवळ वासनातृप्तीकरीता संग करणाऱ्या स्त्रीपुरुषांच्या उदरी श्रेष्ठ पुरुष (उत्पन्न होत) येत नाहीत. जे स्त्रीपुरुष शास्त्राज्ञेनुसार केवळ पितृ-ऋणामधून मुक्त होण्याकरीता संतती निर्माण करतात, त्यांच्यासमोर सुखाचा उद्देश नसतो. तेच खरे माता-पिता आहेत. परंतु आपले आईवडील कसेही असले तरी पुत्राच्या दृष्टीने ते पूज्यनीयच आहेत; कारण त्यांनी पुत्राला मानव शरीर प्रदान करून त्याला परमात्म-प्राप्तीचा अधिकारी बनविले आहे, उपनिषदामध्ये वर्णन आढळते की गुरुगृही विद्या संपादन करून जेंव्हा तो गुरुच्या आज्ञेनुसार गृहस्थाश्रमात प्रवेश करतो तेंव्हा त्याला गुरू अशी आज्ञा देतात की—'मातृदेवो भव, पितृदेवो भव'—म्हणजेच तुम्ही माता पित्यांना साक्षात् ईश्वराचे स्वरूप मानून त्यांची सेवा करा, त्यांच्या आज्ञेचे पालन करा. ही ऋषिमुनिनी दिलेली दीक्षान्त शिकवण आहे; आणि तिचे पालन करण्यातच आपले कल्याण आहे, त्यामुळे पुत्राने आपल्या आईवडीलांविषयी नेहमी कृतज्ञ असावे.

**प्रश्न**—मातापित्याने आम्हाला जन्म देऊन 'संसार बंधनात टाकले आहे; भवसागरामध्ये लोटून दिले आहे; तर मग त्यांचे आमच्यावर ऋण कसे काय आहे?

**उत्तर**—अशा प्रकारची धारणा पूर्णतया चूकीची आहे. माता-पित्यानी तर मनुष्यशरीर देऊन संसार-बंधनातून, जन्म-

मरणाच्या चक्रामधून सूटका करुन देण्याची संधी प्रदान केली आहे, आईवडीलांनी मुलांना बंधनात टाकलेही नाही, तसेच तसा त्यांचा उद्देश देखील नाही, ते नित्य निरंतर आपल्या पुत्राच्या कल्याणाचीच इच्छा करीत असतात आणि त्या दिशेनेच प्रयत्नही करीत असतात; परंतु आम्ही पदार्थ, भोग, परिस्थिती व्यक्ती इत्यादीच्या बाबतीत ममत्व मानून त्यांच्यापासून सुख भोगण्याच्या इच्छेनेच बंधनामध्ये अडकून पडत असतो, तात्पर्य असे आहे की, सुखाची इच्छा, सुखाचा भोग आणि सुखाच्या आशेचा त्याग करून पुत्र जर मातापित्याच्या सेवेला परमात्मप्राप्तीचे साधन मानून तत्परनेने त्यांची सेवा करेल तर त्याचा संसारा-पासून संबंध विच्छेद होऊन त्याला परमात्मप्राप्ती होईल.

पुत्राने आईवडीलांच्या कर्तव्या कडे नजर न टाकता केवळ आपल्या कर्तव्याकडे नजर टाकावी. आपल्या कर्तव्याकडे दृष्टी न टाकता जो पुत्र आईवडीलांच्या कर्तव्याकडे दृष्टी टाकत असेल तर तो आपल्या कर्तव्यापासून दूर जातो. कोणत्याही शास्त्रामध्ये कोणालाही आपल्या मातापित्याच्या गुरुजनांच्या कर्तव्याकडे पाहण्याचा अधिकार दिला गेलेला नाही. पूर्वीची माणसे दुसऱ्यांच्या कर्तव्याकडे पाहत नव्हते तर आपल्या कर्तव्याकडे पाहत होते, आपल्या कर्तव्याचे पालन करीत असत; त्यामुळेच ते जीवन्मुक्त भगवद्भक्त होत असत. जर त्यांनी इतराच्या कर्तव्याकडे बोट दाखवून स्वतःच्या स्वार्थाचा विचार केला असता तर आजच्या प्रमाणे बेजबाबदार, माजलेला समाज सर्वत्र दृष्टोत्पत्तीस आला असता? ज्यांनी केवळ आपल्या कर्तव्याचाच विचार केला, स्वकर्तव्याचेच पालन केले आहे त्या संत महात्म्यांकडे, धर्मात्म्यांकडे भारतीय जनता किती आदरपूर्वक पाहते. म्हणून मनुष्याने आपल्या कर्तव्याकडे कधीही पाठ फिरवू नये.

'कर्तव्या' विषयी एक मार्मिक विवेचन असे की केवळ कर्तव्य समजून त्याचे पालन केल्यामुळे संबंध विच्छेद होत असतो. जसे जे माता-पित्याची सेवा केवळ आपले कर्तव्य समजून करतात त्यांचा माता-पित्यापासून संबंध विच्छेद होतो; त्यांच्या मनात आई-वडीलाविषयी प्रेम उत्पन्न होत नाही. परंतु जे आपल्या शरीराला माता-पित्याचेच मानून तत्परतेने आदर आणि प्रेमपूर्वक त्यांची सेवा करतात, त्यांच्या हृदयामध्ये आईवडीला विषयी प्रेम निर्माण होते. ज्याप्रमाणे माणसे अन्नखाण्याला, पाणी पिण्याला आपले कर्तव्य न मानता प्राणाचा आधार मानतात त्याप्रमाणे आईवडीलांच्या 'सेवेला' आपल्या जीवनाचा आधार मानावयास पाहिजे. त्यांची सेवा करण्यातच आपले जीवन मानावयास पाहिजे, आपले आद्यकर्तव्य मानावयास पाहिजे.

**सेवहिं लखनु सीय रघुबीरहि। जिमि अबिबेकी पुरुष सरीरहि॥**

(मानस, अयोध्या १४२। २)

अशा प्रकारे मातापित्याच्या सेवेला आपल्या प्राणाचा, जीवनाचा आधार मानल्यामुळे 'मी' आणि 'माझे' पण नष्ट होऊन जाते; कारण आपल्या शरीराला मातापित्याचेच मानून त्याची आईवडीलांच्या सेवेमध्ये योजना केल्यास, अर्पण केल्यास, शरीरावर आपला कोणत्याही प्रकारचा अधिकार न मानल्यामुळे अंत:करणातील अहंता-ममता नष्ट होतात.

**प्रश्न**—मनुष्य मातापित्याच्या सेवेला भगवत्प्राप्तीचे साधन मानतो, साध्य मानत नाही. जर तो मातापित्याच्या सेवेलाच साध्य मानेल आपल्या जीवनाचा आधार मानेल तर मातापित्याच्या चरणीच त्याच्या अंत:करणात प्रेम उत्पन्न होईल; तर मग त्याच्या मनात भगवंताविषयी प्रेम कसे उत्पन्न होईल; अथवा त्याला भगवत्प्राप्ती कशी होईल ?

**उत्तर**—या ठिकाणी तीन गोष्टी विचारात घेण्यासारख्या आहेत—(१) जो मातापित्याच्या सेवेलाच साधन आणि साध्य मानून त्यांची सेवा करतो, त्यांच्या सेवेलाच आपल्या जीवनाचा आधार मानतो त्याच्या मनात आईवडीलांच्या चरणाविषयी आवड, प्रेम व भक्ती उत्पन्न होते आणि अंतकाळी तो पितृलोकाप्रत जातो. (२) जो मनुष्य परमात्मप्राप्तीचा उद्देश डोळ्यासमोर ठेवून आईवडीलांची 'सेवा' आपले कर्तव्य समजून करतो त्याचा आईवडीलापासून संबंध-विच्छेद होऊन त्याला परमात्मप्राप्ती होते. (३) जो आईवडीलांना साक्षात् भगवंताचे स्वरूप मानून त्यांची सेवा करतो, त्याला भगवत्प्राप्ती होते. या तीन गोष्टी पैकी ज्याच्या अंतःकरणात जसा भाव असेल तसेच त्याने करावयास पाहिजे.

ज्याप्रमाणे पतिव्रता स्त्री भगवंताच्या, शास्त्राच्या, व महापुरुषांच्या आज्ञेनुसार तन-मन-धनाने पतिची सेवा करते तिला पतिलोकाची प्राप्ती होते—अर्थात् ज्या लोकी पती असेल तोच लोक पतिव्रतेला प्राप्त होतो; परंतु याचा अर्थ असा नाही की जर दूराचारी पतिला नरकप्राप्ती झाली असेल तर पतिव्रतेला देखील नरकाचीच प्राप्ती होईल.

ज्या स्त्रीने पतिसेवेला आपला धर्म समजून पातिव्रत्य धारण केले असेल त्या स्त्रीला नरकप्राप्ती कशी होणार ? अर्थात् कधीही नरकप्राप्ती होणार नाही. तीने पातिव्रत्य धर्माचे पालन केलेले असल्यामुळे तिला ज्या लोकांची प्राप्ती होईल तोच लोक पतिला देखील प्राप्त होईल, तात्पर्य असे आहे की पातिव्रत्य धर्माच्या तपोबलामुळे तिचे आणि तिच्या पतिचे दोघाचेही कल्याण होईल. अशाप्रकारे जो आईवडीलाच्या सेवेलाच साधन आणि साध्य मानून त्यांची सेवा करीत असेल त्याला आणि त्याच्या माता-पित्याला भगवत्प्राप्ती होते.

**प्रश्न**—असे म्हणतातकी, हे मनुष्यशरीर आपणाला आपल्या कर्माच्या आणि भाग्याच्या योगाने मिळाले आहे—***बड़े भाग मानुष तनु पावा***'; आणि भगवंतांनी विशेष कृपा करून मनुष्यशरीर दिले आहे—'***कबहुँक करि करुना नर देही। देत ईस बिनु हेतु सनेही***' तर मग हे शरीर आईवडीलापासून मिळाले आहे—असे म्हणणे कितपत योग्य आहे?

**उत्तर**—हे शरीर मिळण्यामध्ये प्रारब्ध (कर्म) आणि भगवत्कृपा हे तर 'निमित्त कारण' आहेत; आणि माता-पिता हे उपादान कारण आहेत. ज्याप्रमाणे घडा माती पासून बनतो तर माती हे घड्याचे उपादान कारण आहे आणि जो कुंभार घडा बनविण्याविषयी निमित्त बनतो तो निमित्त कारण आहे. जे कार्यरूपामध्ये परिणत होण्याकरीता कारण बनते त्यालाच उपादान कारण असे म्हणतात. निमित्त कारण 'अनेक' (कोणीही) असू शकतात. ज्याप्रमाणे घडा बनविण्या करीता कुंभार चाक, काठी, इत्यादी निमित्त कारण आहेत, परंतु यापैकी कुंभार हा मुख्य निमित्त कारण आहे. त्याप्रमाणे आपणाला हे मनुष्यशरीर प्राप्त होण्यामध्ये मातापिता हे मुख्य उपादान कारण आहेत कारण त्यांच्याच रज-वीर्यापासून हे शरीर निर्माण होत असते.

जन्म आणि आयुष्यमर्यादा प्राप्त होण्यामध्ये, तसेच अनुकूल-प्रतिकूल परिस्थिती तयार होण्यामध्ये 'कर्म' हे निमित्त कारण आहे; आणि कोणत्या प्रकारच्या कर्माचे कोणत्या काळामध्ये कोणते फल मिळेल; कशी परिस्थिति तयार होईल'—अशा प्रकारची कर्मव्यवस्था तयार करण्यामध्ये कर्मफल प्रदान करण्यामध्ये भगवत्कृपा 'निमित्त कारण' आहे; म्हणजेच सर्व कांही भगवंताच्या इच्छेनुसार भगवंताच्या विधानानुसारच घडून येत असते. कारण कर्म 'जड' असल्यामुळे स्वतःहून कर्मफल प्रदान करू शकत

नाहीत जर कर्मफलाचा निर्णय आपल्या हाती असता तर प्रत्येकांनी शुभकर्माचेच फळ घेतले असते; अशुभ कर्माचे फळ घेणारच कोण? ज्याप्रमाणे जगामध्ये असे पहावयास मिळते की, मनुष्य शुभकर्मांचे फळ स्वत:हून स्विकार करतो आणि अशुभ कर्माचे (चोरी, डाकूगीरी इत्यादीचे) फळ (दंड, सजा) स्वत:हून स्विकार करीत नाही तर त्याला शासनव्यवस्थेनुसार शासन केल्या जाते.

आई आपल्या मुलांसाठी किती त्रास सहन करते, त्याला आपल्या गर्भामध्ये धारण करते, प्रसुतिच्या प्रसंगी असह्य वेदना सहन करते, अंगावरील दूध पाजून त्याला वाढविते मोठ्या लाडाने व कौतुकाने त्याचे पालन पोषण करते, खाणे, पिणे चालणे, बसणे उठणे इत्यादी गोष्टी त्याला शिकविते. असे हे आईचे ऋण कोणताही पुत्र फेडू शकत नाही. म्हणून पुत्राने आईप्रती नेहमी कृतज्ञ असावे. अशाच प्रकारे वडील देखील अनायासेच मुलांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था लावून देत असतात, त्याला विद्या शिकवून 'योग्य' बनवित असतात, उदरनिर्वाहाचा व्यवसाय, (धंदा) त्याला शिकवितात, त्याचे लग्न करून देतात असे हे पित्याचे ऋण देखील मुलाकडून फेडल्या जाऊ शकत नाही. म्हणूनच मातापित्याविषयी कृतज्ञ राहून, त्यांची आज्ञा पालन करणे त्याची सेवा करणे, त्यांचे चित्त प्रसन्न ठेवणे; मृत्युनंतर पिंडदान करणे, श्राद्ध-तर्पण करणे इत्यादी पुत्राचे परमकर्तव्य आहे.

प्रश्न—मातापित्याने बाळपणात लहान मुलावर चांगले संस्कार केलेले नसतील तर भविष्यात मुले आई—वडीलांची सेवा करणार नाहीत; यामध्ये मुलांचा काय दोष आहे?

उत्तर—आईवडीलांनी मुलांवर योग्य संस्कार केले नसतील

तर त्यांचा दोष मातापित्याकडे जातो; कारण त्यांनी आपल्या कर्तव्याचे पालन केलेले नाही. परंतु आईवडीलांचे दोष पाहणे हे मुलांचे कर्तव्य नाही मुलाने तर स्वतःचे कर्तव्य पाहिले पाहिजे. दुसऱ्यांच्या दोषाकडे (कर्तव्याकडे) पाहिले तर मनुष्य आपल्या कर्तव्यापासून दूर जातो. इतरांच्या कर्तव्याकडे नजर टाकणे हाच फार भयंकर दोष आहे. गीतेमध्ये देखील स्वतःचा उद्धार स्वतःच करण्याची, आपली सुधारणा आपणच करण्याची माहिती (विवेचन) सांगितली आहे* कारण सुसंस्कार देखील धारण करणाऱ्यावरच अवलंबून आहेत. चांगले संस्कार धारण न करता मुलगा जर आपण होऊन वाममार्गत शिरला तर तो त्याचा स्वतः दोष आहे, त्यामुळे आपली प्रगती अथवा अधोगती ही सर्वस्वी आपल्यावरच अवलंबून आहे.

प्रश्न—जर आईवडीलच मुलाला वाईट वागणूक देत असतील, पक्षपात करीत असतील तर अशा वेळी मुलाचे कोणते कर्तव्य ठरते?

उत्तर—त्या मुलाने आईवडीलांच्या कर्तव्याकडे नजर टाकू नये. त्याने तर आपल्याच कर्तव्याचा विचार सतत मनात ठेवून उत्साहपूर्वक आईवडीलांची सेवा करीत रहावे. रामचरितमानसा-मध्ये प्रत्येक व्यक्तीच्या कर्तव्याविषयी सांगितले आहे—

**'मंद करत जो करइ भलाई ॥'** (५।४१।७)

जर मातापिता आपल्या मुलांचा आदर करीत असतील तर

---

* उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।
आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥

(गीता ६।५)

'आपल्या योगाने आपला उद्धार करा, आपली अधोगती करून घेऊ नका कारण आपणच आपले मित्र आहात आणि आपणच आपले शत्रु आहात.

त्याच्या मोबदल्यात पुत्राने केलेली सेवा खर्च होते, विकल्या जाते. परंतु ते मुलांचा आदर न करता निरादर करीत असतील तर पुत्राने केलेली सेवा खर्च होत नाही आईवडीलानी त्रास दिला तर त्यामुळे मुलांची शुद्धता होते; त्यांची सहनशीलता वाढते; तप वाढते; मानमान्यता वाढते त्यामुळे आईवडीलानी दिलेल्या त्रासाला परमतप समजून प्रसन्न अंतःकरणाने तो त्रास सहन करावयास पाहिजे. आणि असे समजावेकी माझ्यावर माझ्या आईवडीलांची परमकृपा आहे त्यामुळे मी केलेली सेवा मुळीच खर्च न होता मला सात्त्विक सेवेचा आणि शुद्ध तपश्चर्येचा लाभ मिळत आहे. अशी सुवर्णसंधी अत्यंत भाग्यवान लोकानांच मिळत असते आणि माझे तर हे मोठेभाग्य आहे की माझे आईवडील माझ्या सेवेचा स्विकार करीत आहेत. जरी ते मुलांनी केलेल्या सेवेचा स्विकार करीत नसतील तरीही मुलांनी आईवडीलांच्या सेवेमध्ये खंड पडू देऊ नये. सेवेमध्ये जर कांही चुका अथवा दोष आढळत असतील तर मुलांनी त्याविषयी योग्य त्या सुधारणा ताबडतोब कराव्यात.

जो मुलगा धनद्रव्य, शेतीवाडी, घरदार इत्यादी मिळण्याच्या आशेने आईवडीलांची सेवा करतो तो वास्तविक दृष्ट्या आईवडीलांची सेवा न करता धनद्रव्य इत्यादिचींच सेवा करीत असतो. पुत्राने केवळ आईवडीलांच्या सेवेचाच संबंध ठेवावयास पाहिजे. त्याने आपल्या आईवडीलांना असे सांगावे की आपणाजवळ धनसंपत्ती इत्यादी जे कांही आहे ते तुम्ही माझ्या भावांना द्या, बहिणींना द्या, अथवा आपल्या मनास वाटेल त्यांना द्या; मला फक्त आपली सेवा करू द्या, आईवडील आपण केलेल्या सेवेचा स्विकार करतात—हीच तर त्यांची कृपा मानावी.

**प्रश्न**—जर आईवडील मुलाला निषिद्ध, अनुचित कर्मे

करण्या-विषयी मुलाला प्रवृत करीत असतील तर अशा प्रसंगी मुलाने काय करावे?

**उत्तर**—अनुचित आज्ञा दोन प्रकारची असते—(१) अमुक व्यक्तीचा खून कर इत्यादी, दुसऱ्यांचे वाईट करण्याविषयीची आज्ञा देणे आणि (२) माझे घर सोडून तू वनवासात जा; इत्यादी प्रकारची आज्ञा देणे. यापैकी पहिल्या प्रकारच्या आज्ञेचे मुळीच पालन करू नये तर दुसऱ्या प्रकारच्या आज्ञेचे पालन करावे. याविषयी पित्याच्या सामर्थ्याची जाणीव ठेवावी. जर पिता समर्थ असेल तर त्यांनी दिलेल्या अनुचित आज्ञेचे पालन करण्यास मुळीच हरकत नाही. ज्याप्रमाणे जमदग्नीनीं परशुरामाला आज्ञा केली होती की तुझी आई व्यभिचारिणी आहे; तुझे इतर बांधव माझ्या आज्ञेचे पालन करत नाहीत, त्यामुळे तू यांचा शिरच्छेद कर—तेंव्हा परशुरामानी आपल्या आईचा व भावांचा शिरच्छेद केला होता. यावर प्रसन्न होऊन जमदग्नीनीं परशुरामाला 'वर माग' असे म्हटले. परशुरामानी वर मागीतलाकी 'माझी आई व सर्व भाऊ जीवंत व्हावेत; आणि मी त्यांची हत्या केलेली आहे याचेही त्यांना स्मरण राहू नये.' जमदग्नीनीं 'तथास्तु' म्हणताच सर्वजण जीवंत झाले.

जर पित्याच्या ठिकाणी योग्यता सामर्थ्य नसेल आणि जर ते अनुचित आज्ञा देत असतील तर पुत्राने त्या आज्ञेचे पालन करू नये; कारण पुत्राने जर त्या अनुचित आज्ञेचे पालन केले तर पित्याला नरकप्राप्ती होईल. ज्या आज्ञेच्या पालनामुळे पित्याला नरकप्राप्ती होईल, दुःख प्राप्त होईल त्या आज्ञेचे पालन पुत्राने करू नये. 'मला भलेही नरकप्राप्ती होवो परंतु माझ्या पित्याला नरकप्राप्ती मुळीच होऊ नये' अशी भावना पुत्राच्या ठिकाणी असेल तर दोघानांही नरकप्राप्ती होणार नाही.

तात्पर्य असे आहे की, नरकप्राप्ती टाळण्याकरीता पित्याची आज्ञाभंग करा परंतु अनुचित काम कधीही करू नका.

जर पित्याच्या ठिकाणी योग्यता सामर्थ्य नसेल आणि ते अनुचित आज्ञा देत असतील; पुत्र देखील पितृभक्त असेल त्याने कधीही पित्याची आज्ञाभंग केलेली नसेल तर पुत्राने पित्याच्या अनुचित आज्ञेचे पालन करण्याकरीता घाईघाईने कोणताही निर्णय घेऊ नये; भगवंताचे स्मरण करून विचारपूर्वक निर्णय घ्यावा. याबाबतीत पुढील उदाहरण देता येईल. गौतमाने आपल्या पुत्राला—चिरकारीला—सांगितले की, 'तुझी आई व्यभिचारिणी आहे; तिचा शिरच्छेद कर.' अशी आज्ञा देऊन ते वनवासात निघून गेले. चिरकारीने तलवार हातात घेतली आणि पित्याने दिलेल्या आज्ञेवर विचार करू लागला. गौतमाच्या मनात इकडे वनामध्ये असतांना असा विचार आला की, 'तिचा' वध करण्याची गरजच काय? तिचा तर त्याग देखील केला जाऊ शकतो.' असा विचार मनात येताच ते वनामधून परत आले आणि पाहतात तर चिरकारी हातात तलवार घेऊन ऊभा आहे. त्यांनी चिरकारीला त्याच्या आईचा वध न करण्याची आज्ञा दिली.

**प्रश्न**—गोस्वामी तुलसीदासजीनीं म्हटले आहे—

**जाके प्रिय न राम-वैदेही।**
**तजिये ताहि कोटि बैरी सम, जद्यपि परम सनेही॥**
**तज्यो पिता प्रह्लाद, विभीषण बंधु, भरत महतारी।**
**बलि गुरु तज्यो, कंत ब्रज-बनितन्हि, भये मुद मंगलकारी॥**

प्रल्हादाने पित्याचा, बिभीषणाने भावाचा, भरताने आईचा, बलीने गुरुचा आणि गोपिकांनी पतिचा त्याग केला—तर मग त्यांना दोष लागला नाही काय?

**उत्तर**—या ठिकाणी लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी आहे की त्यांनी पिता, भाऊ, इत्यादींचा त्याग कोणत्या कारणास्तव केला? हिरण्यकश्यपु हे प्रल्हादाला अत्यंत त्रास देत असत परंतु प्रल्हादजी तो त्रास आनन्दाने सहन करीत असत. प्रल्हादजी असे समजत असत की, हे शरीर पित्यापासून प्राप्त झालेले आहे. या शरीरावर त्यांचाच खऱ्या अर्थाने पूर्णपणे अधिकार आहे. त्यामुळे त्याला 'मला कां छळता?' असा प्रश्न पिताजीना कधीही विचारला नाही. परंतु मी (स्वयं) तर साक्षात् परमेश्वराचा अंश आहे त्यामुळे मी नित्यनिरंतर भगवंताच्या सेवेमध्येच मग्न असतो या कामामध्ये माझे पिताजी मला अडथळा आणतात, मला परावृत करू पाहतात,—हे योग्य नाही. या कारणामुळे प्रल्हादाने पित्याच्या त्या आज्ञेचा त्याग केला त्यामुळे त्यांच्या पित्यांना देखील नरकप्राप्ती होऊ शकली नाही. पिताजीची आज्ञा पालन करून जर प्रल्हादाने भगवत्भक्तीचा त्याग केला असता तर त्याचे प्रायश्चित पित्याला भोगावे लागले असते. वडीलांना प्रायश्चित भोगावे लागेल असे कोणत्याही प्रकारचे काम मुलांनी कधीही करू नये हा दृष्टीकोण समोर ठेवून प्रल्हादाने पित्याची आज्ञा मोडली हे एका अर्थाने पित्याच्या हिताचेच झाले प्रल्हादाने पित्याचा त्याग केला नाही.

रावणाने बिभीषणाला लात मारली आणि सांगितले की, माझ्या घरातून चालता हो! म्हणून बिभीषण रामाला जाऊन मिळाला. यावरून असे दिसते की, बिभीषणाने आपल्या भावाचा त्याग न करता त्याच्या ठिकाणी असलेल्या अन्यायीवृतीचा त्यागकेला. बिभीषणाने अन्यायाचे समर्थन केले नाही अथवा अन्यायाला अनुमोदनही दिले नाही. बिभीषणाने रावणाला त्याच्या कल्याणाच्याच गोष्टी सांगितल्या आणि शेवटपर्यंत त्याचे कल्याणच चिंतिले.

आपल्या आईने रामाला वनवासात पाठविले आहे, दुःख भोगावयास लावले आहे—त्यामुळे भरताने आपल्या आईचा त्याग केला. 'ज्याप्रमाणे माता कौसल्या माझ्यावर 'रामापेक्षाही अधिक प्रेम करते त्याप्रमाणे तू देखील माझ्यापेक्षा अधिक प्रेम रामावर करावयास पाहिजे होते' असे भरत आपल्या आईला म्हणाला; परंतु तू रामाला वनवासात पाठविले आहे; जर तू रामाचीच आई नाहीस तर मी देखील तुला आई कोणत्या तोंडाने म्हणू? या संदर्भात तुला शिक्षा देणे देखील मला योग्य नाही. मी फक्त तुला 'आई' म्हणणार नाही. याशिवाय आणखी दूसरे काय करू?

बलीने आपल्या गुरुचा या कारणास्तव त्याग केला की, साक्षात भगवान ब्राम्हणाच्या रूपाने येऊन मला दान मागत आहेत परंतु माझे गुरु मला दान देण्यापासून परावृत करीत आहेत, त्यामुळे मी गुरुचे म्हणणे ऐकणार नाही. गुरुच्या 'म्हणण्याचा' त्याग तर बलीने त्यांच्या हिताकरीताच केला. बली दान देण्याकरीता तयारीतच होते. जर त्यावेळी त्यांनी गुरुचे म्हणणे ऐकले असते तर त्याबद्दलचा दोष गुरुला लागला असता. त्याकरीता त्यांनी गुरुच्या शापाचा स्विकार केला आणि 'अधोगती' होण्यापासून गुरुला वाचविले. स्वतः शिक्षा भोगून गुरुला वाचविले हीला तर खरी गुरुसेवा म्हणावी लागते.

भगवंताला सन्मुख होण्याकरीता आपले पती अडथळा आणत आहेत—या संदर्भात गोपिकांनी आपल्या पतींचा त्याग केला. जर त्यांनी पतींचे म्हणणे मान्य केले असते तर पापांचे भागीदार त्यांचे पतीच झाले असते. म्हणून पतींचे म्हणणे मान्य न करून त्यानी आपल्या पतीनां पापापासून वाचविले.

तात्पर्य असे आहे की मनुष्यदेहाची सार्थकता परमेश्वरप्राप्ती

करून घेण्यामध्येच आहे. म्हणून त्याविषयी मदत करणारी व्यक्ती आपले हित करीत असते आणि याउलट वागणारी व्यक्ती आपले अहितच करीत असते. प्रल्हादादी सर्वांनी परमेश्वरप्राप्तीमध्ये बाधा आणणाऱ्याचाच त्याग केलेला आहे; पिता बांधव इत्यादींचा त्याग केलेला नाही म्हणून त्यांचे कल्याणच झाले.

**प्रश्न**—वडील व आई यापैकी कोणाचा दर्जा श्रेष्ठ आहे? आणि दर्जा श्रेष्ठ असण्याचे कारण काय आहे?

**उत्तर**—आईचा दर्जा वडीलापेक्षा श्रेष्ठ आहे. तो हजारपट अधिक श्रेष्ठ सांगितल्या गेला आहे—**सहस्त्रं तु पितॄन्माता गौरवेणातिरिच्यते**' (मनु २। १४५) राम जेंव्हा वनवासात जायला निघाले तेव्हा ते आपल्या आई कडे गेले आणि तिच्या चरणी वंदन करून म्हणाले. 'आई मला वनवासात जाण्याविषयीची आज्ञा देण्यात आलेली आहे.' आईने म्हटले, 'जर केवळ वडीलांची आज्ञा अशी असेल तर आईला श्रेष्ठ समजून तू वनवासात जाऊ नको'—

**जौ केवल पितु आयसु ताता। तौ जनि जाहु जानि बड़ि माता॥**

(मानस, अयोध्या; ५६। १)

होय! जर तुझ्या सावत्र आईने (कैकेयीने आणि वडीलाने तुला वनात जाण्याविषयीची आज्ञा केली असेल तर.*

ते वन तुझ्याकरीता शंभर अयोध्येप्रमाणे श्रेष्ठ आहे—

**जौ पितु मातु कहेउ बन जाना। तौ कानन सत अवध समाना॥**

(मानस, अयोध्या ५६। २)

---

* कौसल्येने आपल्यापेक्षा कनिष्ठ आईचाही आदर करण्याबद्दल सांगितले आहे. हा तिच्या मनाचा मोठेपणा आहे. कौसल्येने सर्वांना अशी शिकवण दिली होती की 'स्वत:च्या आईपेक्षाही सावत्र आईचा जास्त आदर करावा, त्यामुळे कुटुंबामधील प्रेम कायम टिकून राहते.

वडील धन संपती इत्यादीच्या योगाने आपल्या मुलांचे पालन-पोषण करीत असतात तर आई आपले शरीर देऊन आपल्या मुलांचे पालन-पोषण करीत असते. धन संपती इत्यादी ममताजन्य वस्तु आहेत तर शरीर ही अहंतेची वस्तु आहे. ममतेपेक्षा अहंतेचा संबंध जवळचा आहे. ममताजन्य वस्तु अवागमनशील आहेत; परंतु शरीर मृत्युपर्यंत साथ देणारे आहे; त्यामुळे आईचा दर्जा वडीलापेक्षा श्रेष्ठच आहे.

आईने आपले तारुण्य प्रदान करून, आपल्या शरीराचा अंश (भाग) देऊन आपले दूध पाजून मुलांचे पालनपोषण केलेले आहे. आईने, दायीचे, धोब्याचे, शिष्याचे, गुरुचे देखील पात्र रंगविलेले आहे. इतकेच नव्हे तर मलमूत्र साफ करून भंग्याचे काम देखील आपल्या मुलाबाळाकरीता केलेले आहे. ही सर्व प्रकारची कामे 'ओझे न समजता अत्यंत ममतापूर्वक स्नेहाने व उत्साहाने केलेली आहेत, आणि त्याविषयी कोणत्याही प्रकारच्या मोबदल्याची अपेक्षा केलेली नाही. मुले बाळे आजारी असतील आईला जेवण गोड लागत नाही. (तिचे वजन घटते) म्हणून आई प्रमाणे आपल्या मुलांचे पालन-पोषण करणारा या जगामध्ये दुसरा कोण आहे! **'मात्रा समं नास्ति शरीरपोषणम्'** त्यामुळे आईचा दर्जा सर्वश्रेष्ठ आहे. शास्त्रामध्ये वर्णन आढळते की मुलगा साधु संन्यासी झालेला असेल तरीही—आई समोर आली असता त्याने आईला साष्टांग दंडवत करावा. इतका श्रेष्ठ दर्जा कोणाचा असू शकतो. ?

**प्रश्न**—आईवडीलांची सेवा केल्यामुळे कोणता लाभ होतो ?

**उत्तर**—आईवडीलांची सेवा केल्यामुळे इहलोक व परलोकातही मनुष्याचे कल्याण होते; भगवंत प्रसन्न होतात. जो मनुष्य आपल्या आईवडीलांची सेवा करीत नाही त्यावर भगवंत विश्वास

ठेवत नाहीत, कारण जो आपल्या आईवडीलांचीच सेवा (भक्ती) करीत नाही तो भगवंताची भक्ती काय करणार?

पुंडलिकाने तर तन-मन-धनाने आणि तत्परतेने आईवडीलांची सेवा केलेली आहे. त्यांच्या या सेवेमुळे प्रसन्न होऊन भगवंत न बोलावताच त्यांच्या घरी गेले आणि म्हणाले—'पुंडलिका, तू केलेल्या आई वडीलांच्या सेवेमुळे प्रसन्न होऊन मी स्वतः तुझे दर्शन घेण्याकरीता तुझ्या घरी आलो आहे.' पुंडलिक त्यावेळी आपल्या आईवडीलांची सेवा करीत होते. त्यामुळे ते भगवंताला म्हणाले की ज्या मातापित्याच्या सेवेच्या योगाने तुम्ही माझे दर्शन करण्याकरीता आला आहात, ती सेवा मी कशी काय सोडून देऊ; सध्या मी माझ्या आईवडीलांची सेवा करीत आहे. ती पूर्ण झाल्यानंतर मी आपले दर्शन घेईन. तोपर्यंत आपली थांबण्याची इच्छा असेल तर आपण या विटेवर ऊभे रहावे; असे म्हणून पुंडलिकाने दोन विटा पीठीभागे फेकल्या भगवंत त्यावर ऊभे राहीले. विटेवर ऊभे राहिल्यामुळे च भगवंताचे नांव 'विठ्ठल' असे पडले आहे. भगवंताच्या या रूपाचे (विठ्ठलाचे) दर्शन करण्याची कोणाची इच्छा असेल तर त्याने महाराष्ट्रामधील पंढरपुरला जावे. अशाच प्रकारची एक गोष्ट महाभारतामध्ये— 'मूक-चांडळाची आढळते. मूक चांडाळ माता-पित्याची भक्ती करीत होता हे पाहून प्रत्यक्ष भगवंत त्याच्या घरी निवास करीत असत. तात्पर्य असे आहे की, आईवडीलांच्या सेवेमुळे इहलोक व परलोकातही मनुष्याचे कल्याण होते.

**प्रश्न**—जर आईवडीलांच्या सेवेचे एवढे महात्म्य आहे तर त्यांची सेवा करण्याचे सोडून लोक साधु-संन्यासी का होतात?

**उत्तर**—ज्याप्रमाणे कोणी मरण पावतो तर तो आपल्या आई-वडीलांच्या सेवेचा त्याग करूनच मरतो परंतु त्यामुळे

त्याला आईवडीलांच्या सेवेचा त्याग केल्याचा दोष लागत नाही; त्याप्रमाणे ज्याला संसाराविषयी खरे वैराग्य उत्पन्न झाले आहे तो दोषाचा भागीदार होत नाहीं. अशा प्रकारे जो भगवंताला पूर्णपणे शरण जातो त्याला कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाहीं; कारण त्यावर कोणाचेही ऋण राहत नाही—

**देवर्षिभूताप्तनृणां पितॄणां**
**न किंकरो नायमृणी च राजन्।**
**सर्वात्मना यः शरणं शरण्यं**
**गतो मुकुन्दं परिहृत्य कर्तम्॥**

(श्रीमद्भा ११।५।४१)

हे राजन्! जो मनुष्य सर्व प्रकारच्या कामनांचा त्याग करून सम्पूर्णपणे शरणागतवत्सल भगवंताला शरण जातो तो देव, ऋषी, प्राणी, कुटुंबीय, आणि पितर—यापैकी कोणाचाही ऋणी अथवा सेवक राहत नाही.

तात्पर्य असे आहे की 'परमेश्वरप्राप्ती' हेच मनुष्य जन्माचे वास्तविक ध्येय आहे. त्याकरीता जर माता-पित्याच्या सेवेचा, परिवाराचा त्याग होत असेल तर त्यामुळे कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाही.

**प्रश्न**—एखाद्या व्यक्तीला तीन-चार मुले असतील आणि त्यापैकी एखादा मुलगा साधु-संन्यासी बनला तर कांही हरकत नाही; परंतु ज्या व्यक्तीला एकुलता एकच मुलगा असेल आणि तो जर साधु-संन्यासी बनला तर त्याच्या आईवडीलाने वृद्धापकाळात कोणाच्या आधाराने जीवन जगावे?

**उत्तर**—अशा प्रकारच्या एकुलत्या एका मुलाने आजीवन आपल्या आईवडीलांची सेवा करावी; त्यांना कधीही अंतर देऊ नये. कारण भगवत्प्राप्तीसाठी साधुच बनावे लागते असा काही

नियम नाही. संसाराविषयी आपल्या अंतःकरणात वैराग्य उत्पन्न झाले तर परमेश्वराविषयी आपोआपच प्रेम उत्पन्न होते. म्हणून मुलाने आई-वडीलांची सेवा करीत असतानांच भगवंताचे देखील भजन, स्मरण केले तर त्याला भगवत्प्राप्ती होण्यामध्ये कोणत्याही प्रकारची अडचण येणार नाही; उलट आईवडीलांच्या सेवेमुळे भगवत्प्राप्ती होण्यास मदतच होईल, तात्पर्य असे आहे की आईवडीलांचे ऋण फेडल्याशिवाय त्यांना अंतर देणे मुळीच योग्य नाही. परंतु जर आपल्या अंतःकरणात संसारा विषयी तीव्र वैराग्य उत्पन्न झाले असेल, आणि भगवंताच्या चरणी अनन्य प्रेम उत्पन्न झाले असेल, व अशा परिस्थितीमध्ये आईवडीलांच्या सेवेमध्ये खंड पडला तर त्याचा दोष लागणार नाही.

जो आईवडीलाकडे दुर्लक्ष करून केवळ आपल्या पत्नी-मुलांकडेच विशेष लक्ष देतो त्याला तर दोष लागणारच. तसेच जो आपल्या आईवडीलांना अंतर देऊन साधु बनत आहे; बुवाबाजीच्या नावाखाली समाजाला ठकवून पैसे(द्रव्य) जमा करीत आहे; आपला शिष्यवृंद वाढवित आहे; चैन करीत आहे त्याला तर आईवडीलांची सेवा न करण्याचे पाप लागणारच.

**प्रश्न**—जर एखादा मनुष्य साधु-संन्यासी बनून, पैसे जमा करीत आहे आणि आपल्या माता-पित्याला, पत्नीला, मुलाबाळांना मदतीदाखल पैसे पाठवित आहे, त्यांचे पालन-पोषण करीत आहे तर त्याला दोष लागेल काय?

उत्तर—जो मनुष्य साधु-संन्यासी बनून आपल्या कुटुंबीयांना पैसे पाठवितो तो तर पापाचा भागीदार आहेच परंतु त्या पैशावर उदरनिर्वाह करणारेही पापाचे वाटेकरी आहेत; कारण ते दोन्हीही शास्त्राज्ञेविरूद्ध काम करणारे आहेत, माता-पित्याची सेवा तर तो गृहस्थाश्रमामध्ये राहूनच केली असती, परंतु अवैध धंदे करून

संन्यासाश्रमाला कलंकित करतो अशा व्यक्तिला पाप तर लागणारच.

**प्रश्न**—जर घरामध्ये आईचे पालन करणारा कोणीही राहिला नसेल अशा परिस्थितीमध्ये साधु-संन्यासी झालेला मुलगा आपल्या आईचे पालन-पोषण करू शकतो काय ?

**उत्तर**—आईला कोणाचाही आधार नसेल तर साधु बनलेला मुलगा देखील आईचे पालन करू शकतो. त्याने आपल्या आईचे पालनपोषण अवश्य करावे. जे असमर्थ असतील अशा इतर प्राण्यांची देखील सेवा करावी. आईने तर आपणाला हे शरीर प्रदान केले आहे; अनाथ दुर्बल अवस्थेमध्ये कोणीही आपल्या आईची सेवा केली तर त्याला कोणत्याही प्रकारचा दोष मुळीच लागणार नाही.

**प्रश्न**—लग्नानंतर मुलगी आपल्या सासरी जात असते त्यामुळे ती आपल्या आईवडीलांची सेवा करू शकत नाही. आणि आई वडीलांची सेवा केल्याशिवाय ती मातृपितृ ऋणातून मुक्त कशी होईल ?

**उत्तर**—ज्याप्रमाणे एखाद्या व्यक्तीवर प्रमाणापेक्षा जास्त कर्ज असेल तर; आणि कर्जफेड करावी अशी त्याची मनापासून इच्छा असेल तरीही तो ते कर्ज फेडू शकणार नाही; अशा वेळी जर त्याने आपल्या कर्जदेणाऱ्या जवळ जाऊन—'मी, माझे घरदार, कुटुंबीय, शेतीवाडी इत्यादी सर्वकांही आपणाला समर्पण केले आहे. आपण त्याचा आपल्या मनात येईल तसा उपयोग घेऊ शकता'—असे म्हटले तर त्याच्यावर असलेले कर्ज माफ होते. त्याप्रमाणे कन्या बाळपणापासूनच आपल्या आईवडीलांना समर्पित झालेली असते. ती स्वतःकरीता आपले म्हणून काहीही ठेवत नाही. ज्या ठिकाणी आईवडील तिचा विवाह करून देतील त्या

ठिकाणी ती मोठ्या प्रसन्नतेने गमन करते. ती आपले गोत्र देखील पतिच्या कुळासोबत जोडून देते. ज्या कन्येने एवढा मोठा त्याग केलेला आहे तिच्यावर आईवडीलाचे ऋण कसे राहणार? अर्थात् मुळीच राहणार नाही.

**प्रश्न**—जर आईवडीलानां कोणाचाही आधार नसेल तर विवाहित मुलगी त्यांचे पालन-पोषण करू शकते काय?

**उत्तर**—विवाहित कन्या आपल्या आईवडीलांची सेवा करू शकते. जर तिला मुलेबाळे असतील तर आईवडील त्यांच्या घरचे अन्नपाणी ग्रहण करू शकतात; त्यांच्या घरी राहू शकतात. परंतु जर आपल्या विवाहित कन्येला कोणत्याही प्रकारची संतती नसेल तर तिच्या घरचे अन्नपाणी ग्रहण करण्याचा आईवडीलांना अधिकार नाहीं.

आईवडीलानीं कन्येचे दान (विवाह) केलेले असल्यामुळे ते तिच्या घरचे अन्नपाणी ग्रहण करू शकत नाहीत कारण दान दिलेल्या वस्तुवर दात्याचा कोणत्याही प्रकारचा अधिकार उरत नाही. परंतु कन्येला संतती झाल्यानंतर माता-पिता कन्येच्या घरचे अन्नपाणी ग्रहण करू शकतात. कारण जावयाने केवळ पितृऋणातून मुक्त होण्या-करीताच दुसऱ्याच्या कन्येचा स्विकार केलेला आहे. आणि संतती उत्पन्न झाल्यावर तो पितृऋणातून मुक्त होऊन जातो त्यामुळे कन्येला मुलेबाळे झाल्यानंतर आईवडीलांचा कन्येवर अधिकार पोहोचतो त्यामुळेच तर नातवंडे आपल्या आजा-आजीचे श्राद्ध-तर्पण करू शकतात.

आईवडील ही साक्षात भगवंताची रूपे आहेत. त्यामुळे त्यांना परमेश्वराचे स्वरूप मानून मुलांनी नित्य-निरंतर त्यांची तत्परतेने सेवा करीत राहिले पाहिजे. त्यांची सेवा करण्यामध्ये कोणत्याही

प्रकारची उणीव राहू देऊ नये अथवा खंड पडू देऊ नये कारण हा मनुष्यदेह त्यांचाच (त्यांच्यापासूनच मिळालेला) आहे.

कुटुंबामध्ये असलेले भाऊ—बहिणी माता-पिता इत्यादी सर्वजण आपापली कर्मे करीत असतात परंतु सर्वात मोठी गैरसमजूत (चूक) अशी आहे की ते सर्व कामना, ममता आसक्ती स्वार्थ इत्यादी विकारांना वश होऊन कर्मे करीत असतात त्यामुळे त्यांची इहलोकात आणि परलोकातही हानीच होते. स्वार्थाला वश होऊन केवळ आपल्याकरताच कर्मे केल्यामुळे आपसामध्ये भांडणतंटे, दंगेधोपे, ईर्ष्या, जिद्द इत्यादी निर्माण होत असतात. दुसऱ्यांची सेवा करून त्याबद्दल कांही मोबदल्याची इच्छा केली तर व्यक्तीचा त्या वस्तुसोबत संबंध प्रस्थापित होतो. कोणत्याही प्रकारच्या कर्मासोबत स्वार्थाचा संबंध प्रस्थापित केल्यामुळे ते कर्म तुच्छ आणि बंधनकारक ठरते. स्वार्थी मनुष्याला समाजातील प्रत्येक व्यक्ती नावे ठेवीत असते. मागणाऱ्याला कोणीही जास्ती देण्याची इच्छा करीत नाही. बहुधा असेही पहावयास मिळते की लोभी आणि भोगी व्यक्तीपासून त्याच्या घरातील वस्तू लपवून ठेवल्या जातात. याउलट आपल्याजवळ जे काही असेल (बल, ज्ञान, समय, सामर्थ्य साधनसंपती इत्यादी) त्यांच्या योगाने आपण दुसऱ्यांची सेवा केली तर त्यामुळे इतरांचे कल्याण तर होतेच त्या शिवाय वस्तु, आराम, मानप्रतिष्ठा, आदरसत्कार इत्यादीची इच्छा न करता देखील ते प्राप्त होत असतात. कर्मयोग्याच्या ठिकाणी मान-प्रतिष्ठा इत्यादीची इच्छा नसते कारण .की इच्छाच बंधनामध्ये अडकवणीरी आहे.

मला सर्व प्रकारची सुखे कशी प्राप्त होतील?' केवळ या इच्छेपोटीच मनुष्य कर्तव्यच्युत होतो त्याला पाप लागते व त्याचे

अधःपतन देखील होत असते. त्यामुळे 'दुसऱ्याच्या सुखा करीता मी कांही करू शकतो का? अशी भावना कर्मयोग्याने आपल्या अंतःकरणात नेहमी ठेवावी. कुटुंबामध्ये असलेल्या प्रत्येक व्यक्तीने एकमेकाच्या हिताचाच विचार नेहमी करावयास पाहिजे. सेवा करणाऱ्याकडून एक प्रकारची चूक अशी होत असते की, मी सेवा करीत आहे, मी अमुक वस्तुचे दान देत आहे'—अशा प्रकारचा मिथ्या अभिमान तो बाळगत असतो. वास्तविक दृष्ट्या सेवा करणारी व्यक्ती 'सेव्याची' वस्तुच 'सेव्याला' देत असते. ज्याप्रमाणे आईचे दूध इतरांना पिण्याकरीता नसून तिच्या बाळाला, पिण्याकरीता असते त्याप्रमाणे मनुष्याजवळ जेवढी साधन-संपत्ती आहे ती त्याच्या करीता (स्वतःकरीता) नसून इतरा करीताच आहे. त्यामुळे मनुष्याला प्राप्त साधनसंपत्तीविषयी ममता करणे म्हणजेच त्या साधनसंपत्तीला आपली आणि आपल्याकरीता मानण्याचा काहीही अधिकार नाही. ममतेमुळे प्राप्त साधनसामुग्री, संपत्ती चिरकाल टिकून राहणार नाही केवल ममतारूपी बंधन शिल्लक राहील याच कारणामुळे भगवान् श्रीकृष्ण म्हणतात की वस्तुनां आपल्या मानून त्यांचा स्वतःच उपभोग घेणारा मनुष्य 'चोर' आहे.

देवता, ऋषी, पितर, पशु-पक्षी, वृक्षलता, इत्यादी स्वभावताच परोपकारी वृत्तीच्या आहेत. मनुष्य नेहमीच त्यांच्यावर अवलंबून राहत असल्यामुळे त्यांचा ऋणी आहे. या ऋणामधून मुक्त होण्याकरीताच तर पंचमहायज्ञाचे—(ऋषियज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ, पितृयज्ञ, आणि मनुष्ययज्ञ) विधान केलेले आहे. मनुष्य हाच एक असा प्राणी आहे की जो बुद्धिच्या योगाने सर्वानां आपल्या कर्तव्य कर्मानीं तृप्त करू शकतो. त्यामुळे सर्वाधिक जबाबदारी मनुष्यावर आहे. यामुळे परोपकार करून तो परमकल्याणाची प्राप्ती करून घेऊ शकतो.

देवतादी तर आपल्या कर्तव्याचे पालन करीत असतातच. मनुष्य जर आपल्या कर्तव्याचे पालन करीत नसेल तर देवलोकातच नव्हे तर त्रैलोक्यामध्ये खळबळ माजते आणि परिणामी अतिवृष्टी, भूकंप, दुर्भिक्ष्य, इत्यादी प्राकृतिक प्रकोप व्हावयास लागतात भगवान् श्रीकृष्ण देखील (गीता ३। २३-२४ मध्ये) म्हणतात की, जर मी सावधपणे आपल्या कर्तव्याचे पालन करणार नाही तर समस्त लोक नष्टभ्रष्ट होतील ज्याप्रमाणे वेगाने असलेल्या बैलगाडीचे एक चाक मोडले तर पूर्ण बैलगाडीला त्यामुळे धक्का बसतो त्याप्रमाणे या गतीमान सृष्टीमध्ये एक व्यक्ती जरी कर्तव्यच्युत झाला तर त्याचा विपरीत परिणाम संपूर्ण पृथ्वीवर पड़तो. या उलट ज्याप्रमाणे शरीराचे एखादे आजारी अंग (अवयव) आजारातून बरे झाले तर संपूर्ण शरीराला सुख मिळते त्याप्रमाणे आपल्या कर्तव्याचे यथायोग्य रितीने पालन करणाऱ्या मनुष्याकडून संपूर्ण सृष्टीचे कल्याण आपोआपच होत असते.

प्रजापती ब्रह्मदेवाने देवता आणि मनुष्य—या दोघानांही आपापल्या कर्तव्यकर्मांचे पालन करण्याची आज्ञा दिलेली आहे. लोक आपापल्या मर्यादेप्रमाणे वर्तन करतात केवळ मनुष्यच गैरसमजुतीने, चुकून अथवा जाणून बुजून आपल्या मर्यादेचे उल्लंघन करून वर्तन करीत असतो. कारण दुसऱ्याची (इतरांची) सेवाशुश्रुषा करण्याकरीता त्याला जी साधन-सामग्री मिळालेली आहे त्या साधनसंपतीवर त्याने स्वतःचा अधिकार मानला आहे. अनंत जन्माच्या कर्मबंधनापासून सुटका मिळण्याकरीता मनुष्याला स्वातंत्र्य मिळाले आहे; परंतु मनुष्य त्या स्वातन्त्र्याचा दुरुपयोग करून कर्म आणि कर्मफला मध्ये ममता, आसक्ती ठेवित (करीत) असतो त्यामुळे परिणामी नवीन बंधने उत्पन्न होऊन

तो त्यामध्ये अधिक फसतो व भविष्यातील पुढच्या अनंत जन्मामध्ये दु:ख भोगण्याची तयारी करतो. त्यामुळे आपणाला प्राप्त झालेल्या साधन संपतीच्या योगाने त्रैलोक्याची सेवा करावी म्हणजेच त्या साधन संपतीचा विनियोग मनुष्याने परमेश्वर, देवता, ऋषी, पितर, मनुष्ये इत्यादी संपूर्ण प्राणीमात्रांची सेवा करण्याकरीता करावा.

**प्रश्न**—प्राप्त साधनसंपत्ती संपूर्णपणे इतरांची सेवा करण्याकरीता खर्च केली तर कर्मयोग्याचा उदर निर्वाह कसा होईल ?

**उत्तर**—वास्तविक दृष्ट्या अशा प्रकारची शंका शरीरा-सोबत आपले स्वरूप मानल्यामुळे उत्पन्न होते. परंतु कर्मयोगी तर शरीरासोबत आपला कोणत्याही प्रकारचा संबंध मानत नाही. उलट शरीराला संसाराचे आणि संसारकरीताच (जगाकरीता) मानून त्यांच्या सेवेमध्ये योजित असतो. त्याची दृष्टी अविनाशी स्वरूपाकडे लागलेली असते, या नाशीवंत शरीराकडे नसते. ज्याची दृष्टी या नाशीवंत शरीराकडे असते तेच लोक अशा प्रकारची शंका उपस्थित करीत असतात.

जोपर्यंत भोग भोगण्याची इच्छा आपल्या अंत:करणात असते तोपर्यंत जगण्याची इच्छा आणि मृत्युचे भय मनात वास करीत असते. कर्मयोग्याच्या ठिकाणी अशा प्रकारची इच्छा असतच नाही, कारण त्याची संपूर्ण क्रिया कर्मे स्वत: करीता नसून इतरांची सेवा करण्याकरीताच घडून येत असतात. त्यामुळे कर्मयोग्याला जीवन-मृत्युची पर्वा वाटत नाही. आपला उदरनिर्वाह कसा होईल ? असा प्रश्न त्याच्या मनात उद्भवतच नाही. वास्तविक अशा पुरुषाला जगाची 'आवश्यकता' नसते अशा पुरुषांची आवश्यकता जगाला असते; त्यामुळे जग कर्मयोग्याच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था स्वत:हून करीत असते.

ज्यांचे जीवन केवळ परोपकाराकरीताच समर्पित झालेले आहे अशा पशु-पक्षी, कीड़े-माकोडे; वृक्ष-वेली इत्यादी सामान्य जीवांच्या उदरनिर्वाहाची जर व्यवस्था लागलेली आहे तर शरीरासहित प्राप्त झालेल्या संपूर्ण साधनसंपत्तीला प्राणी-मात्रांच्या हितामध्येच खर्च करणाऱ्या मनुष्याच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था होणार नाही, हे कसे काय शक्य आहे?

संपूर्ण सृष्टीचे पालन करणाऱ्या भगवंताच्या असीम कृपेने उदरनिर्वाह सबंधीची साधन-संपत्ती संपूर्ण प्राणीमात्रांना समानरूपाने प्राप्त झालेली आहे. याची प्रत्यक्ष उदाहरणे आपणाला ठिकठिकाणी पहावयास मिळतात आईच्या शरीरामध्ये सर्वत्र केवळ रक्तच रक्त भरलेले असते परंतु त्या शरीरामध्ये बाळाच्या उदरनिर्वाहा करीता पौष्टिक आणि मधुर दूध आपोआप उत्पन्न होते. त्यामुळे प्रारब्ध योगाने म्हणा, मनुष्याला त्याच्या उदरनिर्वाहाची साधन-संपत्ती प्राप्त होत असते. याविषयी कोणीही शंका घेण्याची, चिंता करण्याची, शोक, दुःख अथवा विचार करण्याची काहीही आवश्यकता नाही. परमेश्वराच्या राज्यात जर अत्यंत पापी आणि नास्तिक पुरुषांचा देखील उदरनिर्वाह होतो तर केवळ परोपकाराची भावना मनात ठेवून त्यानुसार संपूर्णपणे वर्तन करणाऱ्या कर्मयोग्याच्या उदरनिर्वाहा विषयी कोणता अडथळा उत्पन्न होईल? त्यामुळे असा प्रश्न मनात उद्‌भवू देणे हीच गैरसमजूत आहे.



# ५. स्त्री-विषयी माहिती—

**प्रश्न**—कन्या 'स्वयंवर' करु शकते काय?

**उत्तर**—शास्त्रामध्ये स्वयंवराचे वर्णन आलेले आढळते; परंतु ज्या स्त्रियांनी 'स्वयंवर' केलेले आहे त्यांना त्यांच्या जीवनामध्ये अत्यंत दुःख प्राप्त झालेले आहे. सीता, द्रौपदी, दमयंती इत्यादी स्त्रियांनी स्वयंवर केले तेंव्हा त्यांच्या जीवनामध्ये दुःखाचीच प्राप्ती झालेली आढळते. आजकाल देखील ज्या मुली स्वयंवर करतात, आपला पती स्वतःच निवडतात, आपल्या मतानुसार लग्न करतात, त्यांना देखील कोणते सुख मिळताना आढळते? त्यांना अत्यंत दारूण दुःखाची प्राप्ती होऊन त्या वणवण भटकताना आढळतात.

ज्या मुली स्वयंवर करतात, त्यांची जबाबदारी स्वतः त्यांच्यावरच पडते. पिता हा कन्येचा हितचिंतक असतो, तो आपल्या कन्येकरीता सुयोग्य वर शोधतो, त्याच्यासोबत संबंध जोडतो; त्यामुळे त्या संबंधाची जबाबदारी पित्यावरच पडते; कन्येवर पडत नाही. पित्याने संबंध जोडल्यानंतर कन्येकडून थोडीशी चूक झाली तरीही ती माफ होऊ शकते; परंतु 'स्वयंवर' करणाऱ्या मुलींची चूक माफ होऊ शकत नाही. ज्याप्रमाणे पुत्राने आपल्या आईवडिलांची सेवा करण्यामध्ये थोडीशी हेळसांड केली तरी त्याला तेवढा दोष लागत नाही. कारण तो त्याच माता-पित्यापासूनच उत्पन्न झालेला (जन्मलेला) असतो. परंतु 'दत्तक' पुत्राने मातापित्याची सेवा करण्यामध्ये हेळसांड केली तर त्याला विशेष शिक्षा भोगावी लागते. कारण त्याने जाणून बुजून संबंध प्रस्थापित केलेला असतो. कोणी एखाद्या व्यक्तीकडे नोकरी करीत असेल तर आपल्या कामामध्ये

झालेली चूक त्याला माफ होत नाही. कारण त्याने आपण होऊन नोकरी स्विकारलेली असते. होय, एवढे मात्र खरे की, मालक दयाळू असेल तर तो त्याला माफ करू शकतो; परंतु तो (नोकर) माफीचा अधिकारी असू शकत नाही. कोणी एखाद्या व्यक्तीला आपला गुरू मानत असेल तर गुरूच्या आज्ञेचे पालन करणे ही त्याची विशेष जबाबदारी ठरते. जर तो गुरूची आज्ञा पाळणार नाही. गुरूचा तिरस्कार करेल, निंदा करेल तर त्याला त्याबद्दल भयंकर शिक्षा भोगावी लागते. त्याला परमेश्वर देखील माफ करू शकत नाही. परमेश्वर क्रोधित झाले तर गुरू माफ करू शकतो परंतु गुरू क्रोधित झाला तर परमेश्वर देखील माफ करू शकत नाहीत. त्यामुळे अशा प्रकारे 'स्वयंवर' करणाऱ्या मुलीवर विशेष जबाबदारी पडत असते.

**प्रश्न**—कन्येने विवाह न करता साधन भजनामध्येच आपले जीवन व्यतित करण्याची इच्छा केली तर ते योग्य होईल काय?

**उत्तर**—मुलींनी विवाह न करणे योग्य नाही. कारण ती स्वतंत्र राहून आपला उदरनिर्वाह करू शकेल ही गोष्ट अत्यंत अवघड आहे. म्हणजेच विवाह न केल्यामुळे तिच्या उदरनिर्वाहामध्ये फार अडचणी येतील. जोपर्यंत आईवडील आहेत तोपर्यंत ठीक आहे. परंतु जेंव्हा आईवडिलांचा मृत्यु होतो तेंव्हा बहुतेक भाऊ (पत्नीला वश झाल्यामुळे) आपल्या बहिणीचा आदर करीत नाहीत; उलट आपल्या बहिणींचा तिरस्कार करतात. तिच्याकडे हीनदृष्टीने पाहतात. भावजया देखील तिच्याकडे तिरस्कारयुक्त नजरेने पाहतात. त्यामुळे मुलींच्या मनात न्यूनगंडाची भावना तयार होऊन त्या स्वतःला 'परतंत्र' समजावयास लागतात. त्यामुळे मुलींनी विवाह करणेच योग्य आहे.

आम्ही असे स्त्री-पुरुष पाहिले आहेत की, ज्यांनी विवाहापूर्वी

अशी प्रतिज्ञा केली होती की, ''आम्ही स्त्री-पुरुष संबंध न ठेवता केवळ साधन भजनच करू'' आणि त्यांनी ही प्रतिज्ञा योग्य प्रकारे निभाविली देखील. आजकाल जरी अशा प्रकारची मुली-मुले मिळणे अवघड असले तरी ती मिळणे अशक्य नाही.

मीराबाई प्रमाणे जे लहानपणापासूनच भजन कीर्तन. स्मरणामध्ये रममाण होतात त्यांची तर गोष्टच वेगळी आहे. परंतु हे 'विधान' नसून 'भाव' आहे. या भावामध्ये देखील कठीणता येत असते. मीराबाईच्या जीवनात अनेक प्रकारची संकटे आली परंतु भगवंताप्रती असलेल्या दृढ विश्वासाच्या बळावर ती सर्व प्रकारच्या संकटातून तरून गेली. एवढा दृढ विश्वास फारच थोड्या ठिकाणी पहावयास मिळतो. ज्यांच्या ठिकाणी असा दृढ विश्वास असेल त्यांच्याकरीता हे विधान केलेले नाही; ''की त्यांनी विवाह करावा अथवा विवाह करू नये.'' तात्पर्य असे आहे की भगवंताच्या चरणी दृढ विश्वास असेल तर मनुष्य कोणत्याही अवस्थेमध्ये अथवा कोणत्याही ठिकाणी असो तो श्रेष्ठत्व पावल्यावाचून राहणार नाही.

**प्रश्न**—स्त्री ने साध्वी अथवा संन्यासीनी बनणे योग्य आहे काय?

**उत्तर**—पुरुषाला तर अशा प्रकारचा अधिकार आहे की, त्याच्या मनात संसाराविषयी वैराग्य उत्पन्न झाले तर त्याने गृहादीचा त्याग करून विरक्त व्हावे. आणि परमेश्वराचे भजन—स्मरण करावयास लागावे; परंतु स्त्रियांकरीता अशा प्रकारची आज्ञा केलेली आम्ही कोठेही पाहिली नाही. म्हणून स्त्रीने साध्वी अथवा संन्यासीनी बनणे योग्य होणार नाही. तिने तर आपल्या घरीच राहून आपल्या कर्तव्याचे पालन करावयास पाहिजे. तिने आपल्या घरातच त्यागमय आणि संयमपूर्वक जीवन जगावे—यामध्येच तिचे श्रेष्ठत्व सामावलेले आहे.

वास्तविक दृष्ट्या त्याग आणि वैराग्यामध्ये जे तत्त्व आहे ते साधू अथवा संन्यासी बनण्यामध्ये मुळीच नाही. जिच्या अंत:करणामध्ये पदार्थाविषयीची गुलामी नाही ती स्त्री घरामध्ये राहत असूनही साध्वी आहे; संन्यासीनी आहे.

**प्रश्न**—पतिव्रता, साध्वी आणि सती कोणाला म्हणतात?

**उत्तर**—जरी शब्दकोशानुसार पतिव्रता, साध्वी आणि सती— या तिन्हीही पदांचा (नावाचा) अर्थ सारखाच आहे तरी या तिन्हीमधील फरक विचारात घेतला तर असे दिसते की, पती जीवंत असतांना जी स्त्री आपल्या 'नियमामध्ये' दृढ राहते ती पतिव्रता आहे; पतिच्या मृत्युनंतर जी स्त्री आपल्या नियमामध्ये दृढ राहते, त्यागामध्ये दृढ राहते ती साध्वी आहे; आणि जी सत्याचे पालन करते, जिचा पतिसोबत दृढ संबंध असतो आणि जी पतिच्या मृत्युनंतर सती जाते ती 'सती' होय.

**प्रश्न**—सतीची प्रथा योग्य आहे की अयोग्य?

**उत्तर**—सती जाणे ही 'प्रथा' मुळात नाहीच. पतिसोबत जळून मरणे याला सती जाणे असे म्हणत नाहीत. जिच्या मनामध्ये 'सत्' येते, उत्साह येतो ती अग्नीशिवाय देखील जळून जाते; तसेच तिला जळतांना कोणत्याही प्रकारचा त्रास होत नाही. ही काही प्रथा नाही की तिने 'असेच' करावे, परंतु हे तर तिचे 'सत्य' आहे; 'धर्म' आहे; शास्त्र मर्यादेवरील विश्वास आहे.

हरदोई जिल्ह्यामध्ये इकनोरा या नावाचे एक गाव आहे. त्या ठिकाणी एक मुलगी आपल्या मामाच्या घरी काही दिवस राहण्या करीता आली होती. तिचा पती आजारी होता; तो मरण पावला; तिला तिच्या पतिच्या निधनाची वार्ता कळाली. तिने आपल्या मामाला विचारले की, सती सुलोचनेला आपल्या पतिचे शिर (डोके) मिळाले नाही तेंव्हा तिने काय केले?

यावर तिचे मामा म्हणाले की, मला माहित नाही. तिने म्हटले, 'मामा मी सती जाणार आहे.' यावर मामा म्हणाले की, 'मुली असे करू नये'. मुलगी म्हणाली की मी असे करत नाही

परंतु ते आपोआपच होत आहे. त्या मुलीने दिवा पेटवून ज्योतीमध्ये आपली करंगळी धरली असता ती मेणबती प्रमाणे जळू लागली. त्यानंतर तिने मामाला म्हटले की आता तरी तुम्ही मला सती जाण्याविषयी आज्ञा द्याल की नाही; आणि जर तशी आज्ञा देत नसाल तर आपले हे 'संपूर्ण घर जळून भस्म होईल. त्यावर मामा म्हणाले की, ठीक आहे; तुझ्या मर्जीप्रमाणे कर, तिने आपली पेटलेली करंगळी एका भिंतीवर घासून विझविली आणि घरून निघून एक पिंपळाच्या झाडाखाली जाऊन ऊभी राहिली; आणि मामाला म्हटले की मला काही लाकडे द्या. यावर मामा म्हणाले की आम्ही तुला लाकडे आणि विस्तव यापैकी काहीही देणार नाही. इतक्या वेळामध्ये त्या ठिकाणी गांवातील बरेच लोक जमले होते. तिने हात जोडून सूर्यनारायणाची प्रार्थना केली की हे नाथ! आपण मला अग्नी द्या! असे म्हणताच ती त्या ठिकाणी ऊभी असतानांच आपोआप पेटून जळून गेली. त्या अग्नीमुळे त्या पिंपळाच्या झाडाची पाने जळून गेली. ही सर्व घटना त्या गावातील लोकांनी प्रत्यक्ष आपल्या डोळ्यानीं पाहिली. त्या ठिकाणी जमलेल्या मुसलमानांना याविषयी विचारले असता त्यांनी देखील सांगितले की होय, ही घटना प्रत्यक्ष आमच्या समोर घडली आहे. श्रीकरपात्रीजी महाराज देखील त्या ठिकाणी गेले होते आणि त्यांनी भिंतीवर ओढलेली ती काळी रेघ पाहिली की जी रेघ तिने पेटलेल्या करंगळीने मारून भिंतीवर आपली करंगळी विझविली होती. तसेच त्यांनी पिंपळाची जळालेली पाने देखील पाहिली.

तात्पर्य असे आहे की ही 'सतीप्रथा' नाही. हा तर स्त्रीचा स्वत:चा धार्मिक उत्साह आहे. या विषयी प्रभुदत्त ब्रह्मचारीजीनीं ''सतीधर्म हिन्दूधर्मकी रीढ़ है।' या नावाचे पुस्तक लिहिले आहे* ते वाचावे.

**प्रश्न**—पतिव्रतेचा 'भाव' आणि' आचरण' कसे असते?

**उत्तर**—तिच्या ठिकाणी धार्मिक भावनांचे प्राबल्य असते. आणि त्यामुळेच ती तन-मन-धनाने पतिची सेवा करीत असते. पतिच्या मनामध्येच आपले मन मिळवून देत असते. स्वत:चे स्वतंत्र असे अस्तित्व मानतच नाही. तिचे मन पतिच्याच ठिकाणी रममाण झालेले असते. तिचे हे पातिव्रत्यच तिचे रक्षण करीत असते.

बहुधा पतिव्रतेचा संबंध पूर्वजन्मीच्या पतिसोबतच राहत असतो. एखाद्या ठिकाणी असेही घडते की लहानपणी मुलींना योग्य शिक्षण, सत्संग मिळाल्यामुळे तिच्या अंत:करणात शुद्ध भाव वास करीत असतात. त्यामुळे विवाहानंतर अशी स्त्री पतिव्रता बनते.

**प्रश्न**—पतिव्रता स्त्रीला ओळखण्याची खूण कोणती आहे?

**उत्तर**—पतिव्रता स्त्रीच्या घरामध्ये 'शांती' वास करीत असते परिवारामधील सर्व सदस्य आपापल्या धर्माचे (कर्तव्याचे) पालन करणारे असतात. तिची संतती देखील श्रेष्ठ आणि आईवडीलांची सेवा करणारी उपजत असते. शेजाऱ्यावर देखील तिच्या सद्‌वर्तणुकीचा परिणाम होत असतो.

पतिव्रतेला पाहणाऱ्यांच्या मनातील वाईट वासना नष्ट होतात;

---

* हे पुस्तक मिळण्याचा पत्ता असा आहे—संकीर्तन भवन, धार्मिक ट्रस्ट; प्रतिष्ठानपूर (झूसी), इलाहाबाद.

परंतु सर्वच ठिकाणी हा नियम लागू पडत नाही कारण पतिव्रतेला पाहून आपल्या अंत:करणातील सद्भावच होतात; ज्याच्या अंत:करणात सद्भावना नसतील त्याच्यावर पतिव्रता स्त्रीचा तितका परिणाम होत नाही. जसे—एका शिकाऱ्याने दमयंतीला अजगराच्या (सापाच्या) तोंडातून सोडविले परंतु तिच्या सौंदर्याला पाहून तो मोहित झाला आणि त्याच्या अंत:करणात पापबुद्धी (दुर्वासना) जागृत झाली. दिलेल्या शापामुळे तो त्याच ठिकाणी भस्म झाला. युधिष्ठिर हे एक महान धर्मात्मा आणि सात्विक पुरुष होते परंतु त्यांच्या वागणुकीचा दुर्योधनावर कोणत्याही प्रकारचा परिणाम झाला नाही.

**प्रश्न**—वर्तमान काळी (सध्याच्या काळात) पातिव्रत्य धर्माचे पालन होऊ शकते काय?

**उत्तर**—पातिव्रत्य धर्माचे पालन करण्याविषयी सध्याचा काळ मुळीच बाधक नाही. स्वत:च्या धर्माचे पालन करण्याविषयी प्रत्येकाला नेहमीच स्वातंत्र्य आहे. धर्मविरुद्ध कामे करण्यामध्ये शास्त्र मर्यादा बाधक आहे.

**प्रश्न**—पति आपल्या पत्नीचा त्याग करू शकतो काय?

**उत्तर**—पत्नी चांगली आहे; सुशिल आहे. परंतु वर्णाने (रंगाने) काळी आहे; आपल्या आईसोबत ती कधीही जुळते मिळते घेत नाही, आईचे कधीच ऐकत नाही; आई म्हणते की—या पत्नीला सोडून दे—अशा परिस्थितिमध्ये जो आपल्या पत्नीचा त्याग करतो तो महापाप करीत असतो, घोर अन्याय करीत असतो. त्यामुळे त्याला भयंकर अशा नरकाचीच प्राप्ती होईल. आजकालची मुले पत्नीला दोषी समजून तिचा त्याग करतात तर ते स्वत: काय दुधाने धुतलेले (निव्वळ पवित्र) आहेत? म्हणून पत्नीचा त्याग कधीही करू नये.

**प्रश्न**—जर पत्नी दुर्वर्तनी, व्यभिचारिणी असेल तर तिचा त्याग करावा की नाही?

**उत्तर**—आजकाल शक्यतोवर अशा पत्नीचा त्याग करू नये. आपल्या सामर्थ्यानुसार तिला आपल्या अधिपत्याखाली ठेवावे, तिला सुधारण्याचे प्रयत्न करावेत जर तिला शिक्षाच द्यायची असेल तर तिच्यासोबत वार्तालाप करू नये आणि तिने केलेले स्वयंपाक देखील ग्रहण करू नये.

**प्रश्न**—पतिचे अर्धे पुण्य पत्नीला आणि पत्नीचे अर्धे पाप पतिला मिळते; असे का?

**उत्तर**—पत्नीने आपल्या आई वडीलांचा, भावा-बहिणींचा घराचा, इत्यादी आप्तजनांचा त्याग केला आहे आणि पुण्य त्यागामुळेच होत असते. तिने आपल्या संपूर्ण नातेवाईकांचा त्याग करून पतिच्या मनामध्ये आपले मन मिळविले आहे; त्यामुळेच ती पुण्याची वाटेकरी होत असते. पति संध्या, गायत्री इत्यादी पुण्यकर्मे करतो तेंव्हा त्यांचे देखील अर्धे फळ (पुण्य) पत्नीला मिळत असते. म्हणून पतिची दोन अंगे असतात—एक आपले आणि एक पत्नीचे.

स्त्रीला लहानपणी योग्य शिक्षण देणे हे आई-वडील, भाऊ इत्यादीवर अवलंबून असते; आणि विवाह झाल्यानंतर तिला शिक्षण देणे हे पतिवर अवलंबून असते. जर पतिकडून सुयोग्य शिक्षण न मिळाल्यामुळे पत्नी पाप करीत असेल तर त्याचे अर्धे पाप पतिला लागते.

जर पति योग्य प्रकारचे शिक्षण देत असेल परंतु पत्नी पतिचे म्हणणे मानत नसेल; पाप करीत असेल त्याचे पाप पतिला लागत नाही. कारण त्याची जबाबदारी तिने स्वत:वरच घेतलेली आहे. अशा प्रकारे जी स्त्री पतिच्या वचनामध्ये राहते; पतिच्या

म्हणण्यानुसार वागते तीच पतिच्या अर्ध्या पुण्याची वाटेकरी होत असते. जी स्त्री पतिच्या मतानुसार वर्तणुक करीत नाही ती पतिच्या अर्ध्या पुण्याची वाटेकरी होत नाही.

**प्रश्न**—अधर्मी लोक स्त्रीचे अपहरण करतात तर त्या स्त्री चे काय करावे ?

**उत्तर**—अशा स्त्रीची शक्यतोवर त्या ठिकाणापासून सुटका करण्याचा प्रयत्न करावयास पाहिजे; आणि वेळ प्रसंगी त्या ठिकाणाहून पळून जावे. कोणत्याही प्रकारचा इलाज चालत नसेल तर भगवंताची आराधना करावी. भगवंत कोणत्या ना कोणत्या तरी रूपाने तिची सुटका करतील.

एका स्त्रीच्या तोंडामध्ये कपडा कोंबून; तिचे दोन्ही हात पाठीमागे बांधून, तिच्या तोंडावर काळ्या रंगाच्या कपड्याचा बुरखा पांघरून काही अधर्मी लोक रेल्वेमधून घेऊन जात होते. लखनऊ नावाच्या स्टेशनावर जेंव्हा तिकीट तपासणीस तिकीटे तपासण्यासाठी तिच्यासमोर येऊन ऊभा राहिला तेंव्हा त्या स्त्रीने आपल्या पायाने तिकीट तपासणीसाचा पाय दाबला; त्याने त्यामुळे असा विचार केला की या स्त्रीने माझा पाय दाबण्यामागे काही तरी गूढ (रहस्य) दडलेले आहे. त्याने रेल्वे पोलीसांना बोलावून आणले आणि त्या स्त्रीची सुटका केली; आणि तिचे अपहरण करणाऱ्यांना पकडले. अशाच प्रकारे नौखालीमध्ये एका अधर्मी पुरुषाने एका स्त्रीला पकडले. त्या स्त्रीने परमेश्वराची करूणा भाकली. तितक्यात दुसरा एक अधर्मी पुरुष तेथे येऊन म्हणाला की "मी या स्त्रीला आपली पत्नी बनविणार आहे". यावरून त्या दोघाचे खूप भांडण झाले आणि ते मरण पावले व त्या स्त्रीची सुटका झाली.

**प्रश्न**—ज्याच्या पत्नीचे अपहरण झाले असेल त्याने काय करावे ?

**उत्तर**—जर त्या पुरुषाच्या ठिकाणी आपल्या स्त्रीची सुटका करण्याचे सामर्थ्य असेल; आणि ती स्त्री समाधान मनाने परत येण्याची इच्छा करीत असेल तर तिला आपल्या घरी वापस आणावयास पाहिजे. कारण तिच्यावर बलात्कार झालेला आहे. त्यामुळे ती जरी एक पतिव्रती राहिली नाही तरी तिचा धर्म बिघडला नाही. आपण स्वतः होऊनच जर धर्म बिघडविला तरच तो बिघडतो. कोणीही कोणावर अत्याचार करून अथवा जबरदस्तीने दुसऱ्याचा धर्म बिघडवू शकत नाही; त्याला धर्मभ्रष्ट करू शकत नाही. कोणी जबरदस्तीने कोणाच्या (शुद्ध शाकाहारी मनुष्याच्या) मुखामध्ये गोमांस जरी टाकत असेल तरी देखील तो त्याला त्याच्या धर्मापासून परावृत करू शकत नाही. म्हणून जर त्या स्त्रीचे मन अपवित्र झाले नसेल; तिने परपुरुषासोबत रतिसुख उपभोगले नसेल तर तिचा पतिव्रताधर्म नष्ट झालेला नाही. म्हणून जर अपहृत स्त्री परत स्वगृही आली तर गीता, रामायण इत्यादी पवित्र ग्रंथाचे पठण करवून, गंगास्नान करवून तिला शुद्ध करून घ्यावे हे सर्व केल्यानंतर जेंव्हा ती रजस्वला होईल तेंव्हा ती संम्पूर्णपणे शुद्ध होऊन जाईल—**'रजसा शुद्ध्यते नारी'**।

जमदग्नी ऋषिची पत्नी रेणुका ही दररोज आपल्या पतिव्रता धर्माच्या पुण्यप्रभावामुळे कपड्यामध्ये पाणी भरून आणू शकत असे. एका दिवशी तिला नदीच्या किनाऱ्यावर सोन्याप्रमाणे चमकणारे सुंदर केस (डोक्याचे केस) दिसले. तिच्या मनात विचार आला की, केस जर इतके सुंदर आहेत तर तो पुरुष किती सुंदर असेल! अशा प्रकारचा विकार तिच्या मनात येताच तिचा पतिव्रता धर्म नष्ट होऊन ती पूर्वीप्रमाणे कपड्यामध्ये पाणी भरून आणू शकली नाही.

इंद्राने गौतम ऋषिचे रूप धारण करून अहिल्येला भ्रष्ट केले तेंव्हा धर्म भ्रष्ट झाला नाही; फक्त तिचे 'एकपतिव्रत' नष्ट झाले. जरी तिच्या पतिने क्रोधाला वश होऊन तिचे 'दगडा' मध्ये (शिळेमध्ये) रूपांतर केले तरी भगवान श्रीरामानीं तिचा उद्धार केला; कारण ती स्वधर्मामध्ये दृढ राहिलेली होती.

गीताप्रेसचे संस्थापक श्रीजयदयालजी गोयन्दका हे शुद्धी आणि पावित्र्याकडे विशेष लक्ष देतात. त्यांनी देखील असे म्हटले आहे की, समाजकंटक लोकांनी जबरदस्ती करून ज्या स्त्रियांना भ्रष्ट केले असेल त्या स्त्रियांचा 'धर्म' भ्रष्ट झालेला नाही. म्हणून अशा स्त्रिया जर पुन्हा हिंदुधर्मात येऊ इच्छित असतील तर त्यांना पुन्हा आपल्या धर्मामध्ये घ्यावे; आणि गंगास्नान, गीता-रामायण पाठ इत्यादी करवून त्यांना शुद्ध करवून घ्यावे. त्यांनी असेही म्हटले आहे की, जर दुसऱ्या धर्माला मानणारी व्यक्ती हिंदुधर्मामध्ये येण्याची इच्छा करीत असेल तर तिला देखील हिंदुधर्मामध्ये घ्यावयास पाहिजे; म्हणजेच ती व्यक्ती देखील 'हिंदू' होऊ शकते. आणि हिंदुधर्मानुसार जप-ध्यान-पूजन-पठण इत्यादी करू शकते.

**प्रश्न**—पत्नी स्वेच्छेने परपुरुषाकडे जाईल आणि पुन्हा परत येईल तर काय करावे?

**उत्तर**—अशा स्त्रीला आपली पत्नी मानू नये. तिच्या सोबत पत्नी प्रमाणे वर्तणूक करू नये. ज्याप्रमाणे संत कूबाजी महाराजांची पत्नी त्यांना सोडून दुसऱ्या पुरुषाकडे गेली; तेथे तिला मुलेबाळे देखील झाली. परंतु जेंव्हा तो पुरुष मरण पावला तेंव्हा तिला आपला उदरनिर्वाह करणे अत्यंत कठीण झाले. म्हणून ती पुन्हा संत कूबाजी महाराजाकडे परत आली. कूबाजी महाराजांनी तिच्या उदर निर्वाहाची व्यवस्था केली परंतु तिला आपल्या पत्नी प्रमाणे मानले नाही.

**प्रश्न**—पती जर दुराचारी, व्यभिचारी असेल तर पत्नीने काय करावयास पाहिजे ?

**उत्तर**—पत्नीने अशा पतिचा त्याग करू नये; उलट आपल्या पतिव्रताधर्माचे पालन करीत त्याला वेळोवेळी समज द्यावी. जसे की मंदोदरीने रावणाला नेहमी 'समज' दिली परंतु त्याचा त्याग केला नाही.

विवाहाच्या वेळी स्त्री आणि पुरूष हे दोघेही एकमेकाला वचनबद्ध होत असतात. त्यानुसार पतिला सल्ला देण्याचा, पतिला आपल्या मनातील विचार सांगण्याचा पत्नीला अधिकार आहे. गांधारी किती उच्च श्रेणीची पतिव्रता होती, जेंव्हा कळाले की ज्याच्यासोबत आपला विवाह होणार आहे, तो नेत्रहीन (आंधळा) आहे तेंव्हा तिने देखील आपल्या डोळ्यावर पट्टी बांधून घेतली. कारण जे 'नेत्रसुख' पतिला मिळू शकत नाही ते सुख मला देखील घ्यावयाचे नाही. परंतु जेव्हा 'समय' आला तेंव्हा तिने आपल्या पतिला समजाविले की, आपण दुर्योधनाचे म्हणणे मानू नये कारण त्यामुळे आपल्या कुळाचा नाश होईल. अशा प्रकारची सल्ला तिने धृतराष्ट्राला अनेक वेळा दिली परंतु त्यांने ती न मानल्या मुळे त्याच्या संपूर्ण कुळाचा नाश झाला. तात्पर्य असे आहे की, पतिला 'योग्य' सल्ला देण्याचा पत्नीला पूर्ण अधिकार आहे.

शास्त्रामध्ये वर्णन आलेले आहे की, जी पतिव्रता स्त्री तन-मनाने पतिची सेवा करते, आपल्या धर्माचे पालन करते, ती मृत्युनंतर पतिलोकांमध्ये (पतिजवळ) जाते. जर पती दुराचारी असेल तर त्याला नरकप्राप्ती होईल; त्यामुळे पतिव्रता स्त्रीला देखील नरकप्राप्तीच व्हावयास पाहिजे. परंतु पतिव्रता स्त्री नरकामध्ये जाऊ शकत नाही, कारण तिने शास्त्र, परमेश्वर, संत-

महात्मे, यांच्या आज्ञेचे पालन केलेले आहे. पातिव्रत्य धर्माचे पालन केलेले आहे. म्हणून ती आपल्या पुण्यप्रभावाच्या योगाने पतिचा उद्धार करेल; म्हणजेच जो 'लोक' पत्नीचा असेल तोच पतिचा होईल. तात्पर्य असे आहे की, आपल्या कर्तव्याचे पालन करणारा मनुष्य दुसऱ्यांचा देखील उद्धार करीत असतो.

**प्रश्न**—जर पतिच आपल्या पत्नीला व्यभिचार करण्याविषयी प्रेरणा (प्रवृत) देत असेल तर पत्नीने काय करावयास पाहिजे?

उत्तर—आपली स्त्री (पत्नी) परपुरुषाला देण्याचा अधिकार पतिला मुळीच नाही; कारण पत्नीच्या पित्याने पतिलाच आपली कन्या दान केली आहे. अन्न, वस्त्रादि वस्तुचे दान स्विकारणारा मनुष्य ते पदार्थ, (वस्तु) दुसऱ्याला देऊ शकतो. परंतु दुसऱ्याची कन्या दानाच्या स्वरूपात स्विकारणारा पती दुसऱ्याला आपली पत्नी देऊ शकत नाही; आणि जर तो असे करीत असेल तर तो महान पापाचा वाटेकरी होतो. अशा परिस्थितीमध्ये पत्नीने आपल्या पतिचे 'म्हणणे' मुळीच मानू नये. आपल्या पतिला असे स्पष्टपणे सांगावे की, 'माझ्या पित्याने माझे दान (कन्यादान) केवळ तुम्हालाच केलेले आहे. म्हणून मला दुसऱ्याच्या ताब्यात देण्याचा अधिकार आपणाला मुळीच नाही. या संदर्भात (याविषयी) ती आपल्या पतिची आज्ञा मोडू शकते. त्याबद्दल तिला कोणत्याही प्रकारचा दोष लागत नाही. कारण पतिची अशा प्रकारची 'आज्ञा' आहे; आणि अन्यायाचा स्विकार करणे म्हणजे अन्यायाला प्रोत्साहन देण्यासारखे आहे; अशी गोष्ट सर्वांकरीताच अयोग्य ठरत असते. दुसरी गोष्ट अशी आहे की, जर पत्नी पतिच्या आज्ञेचे पालन करेल तर त्या पापामुळे पतिला नरकप्राप्ती होईल. त्यामुळे पतिला नरकगामी ठरेल अशा आज्ञेचे पालन पत्नीने कधीही करू नये.

जर पती स्वत: देखील शास्त्र नियम विरुद्ध स्त्री संग करीत असेल तर तो अन्याय, पाप करीत असतो. 'धर्मयुक्त काम' हे भगवंताचे स्वरूप आहे—**'धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ'** (गीता ७।११) म्हणून त्यामध्ये दोष नाही; पाप नाही; परंतु धर्माविरुद्ध मनमानी करून स्त्रीला कामप्रवृत्त करून स्त्रीसंग करणे हा अन्याय आहे. मनुष्याने नेहमी आपली सर्व प्रकारची कर्तव्यकर्मे शास्त्रमर्यादेनुसारच प्रत्येक कामे करावित (गीता १६।२४).

**प्रश्न**—जर पती अभक्ष्य-भक्षण (मांस-मदिरा) करीत असेल तर पत्नीने काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—पत्नीने पतिला वेळोवेळी समज द्यावी; निषिद्ध आचरणापासून त्याची सुटका करण्याचा प्रयत्न करावा. जर पती पत्नीचे मानत नसेल तर तिचा इलाज नाही परंतु आपल्या पतिला योग्य प्रकारची समज देणे हा स्त्री धर्म आहे; अधिकार आहे. परंतु पत्नीने मात्र आपला आहार-विहार शुद्ध आणि पवित्र ठेवावा.

**प्रश्न**—पती जर पत्नीला मारझोड करीत असेल तर पत्नीने काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा परिस्थितीमध्ये पत्नीने असे समजावयास पाहिजे की, हा माझा पूर्वजन्मीचा बदला घेतल्या जात आहे; ऋण फेडून घेतल्या जात आहे; त्यामुळे माझे पाप नष्ट होऊन मी शुद्ध होत आहे. याची माहिती जेंव्हा तिच्या माहेरी कळेल तेंव्हा माहेरचे लोक तिला आपल्या घरी घेऊन जाऊ शकतात, कारण त्यांनी पतिचा मार खाण्याकरीता तिचे लग्न केलेले नाही.

**प्रश्न**—जर माहेरचे लोक देखील तिला आपल्या घरी घेऊन जात नसतील त्तर पत्नीने काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा परिस्थितीमध्ये तर तिने आपल्या पूर्वकर्मांचे फळ भोगावयास पाहिजे. ती बिचारी याशिवाय दुसरे काय करू शकते. तिने पतिपासून मिळणारे दुःख धैर्याने सहन करावे. त्यामुळे तिचे पूर्वजन्मीचे पाप नष्ट होऊन कदाचित तिचा पती पुन्हा तिच्यावर प्रेम करावयास लागेल. जर ती पतिचा मार सहन करण्यास असमर्थ असेल तर तिने पतिला सांगून त्याच्यापासून विभक्त व्हावे आणि आपल्या उदरनिर्वाहाचे काम शोधून भगवंताचे नाम-स्मरण करीत निश्‍चिंतपणे जीवन जगावे.

पुरुषाने कधीही आपल्या पत्नीवर हात उचलू नये; आपल्या पत्नीला मारू नये. शिखंडी भिष्माचार्यांना मारण्या करीताच उत्पन्न झाला होता. परंतु तो जेंव्हा युद्धामध्ये भिष्माचार्यासमोर येतो तेंव्हा ते बाण मारणे बंद करतात. कारण शिखंडी हा पूर्वी स्त्री होता, नंतर त्याला 'पुरुषत्व' प्राप्त झाले होते. त्यामुळे त्याला 'स्त्री'च समजत होते; आणि त्यामुळे त्याच्यावर ते बाण सोडत नव्हते.

संकटाचे दिवस पूर्वजन्मीच्या पापामुळेच प्राप्त होत असतात. संकटकाळी उत्साहपूर्वक भगवंताचे भजन-स्मरण केल्यामुळे दुप्पट लाभ मिळतो. एक म्हणजे पापांचा नाश होतो आणि दुसरे म्हणजे भगवंतावरील आपला 'भाव' दृढ़ होतो. म्हणून संकटकाळी स्त्रीयांनी आपली हिंमत खचू देऊ नये.

संकटकाळामध्ये आत्महत्या करण्याचा विचार देखील मनात आणू नये; कारण आत्महत्या करण्याचे महापाप लागत असते. एखाद्या मनुष्याची हत्या करण्याचे जे पाप लागते तेच पाप आत्महत्या करण्याबद्दल लागत असते. आत्महत्या केल्यामुळे आपले दुःख नष्ट होऊन आपण सुखी होऊ असा विचार

मनुष्याच्या मनात येत असतो. हा तर मूर्खपणाचा कळस होय. कारण जुनीच पापे नष्ट झाली नाहीं आणि त्यामध्ये आणखी नवीन पापाची भर आत्महत्या करून टाकली आहे. ज्यांनी आत्महत्या करण्याचा प्रयत्न केला आणि त्यातून ते वाचले ते म्हणतात की, आत्महत्या करतांना फार दु:ख कष्ट आणि त्रास होतो; मी असे केले नसते तर बरे झाले असते, आता काय करू? असा पश्चाताप व्हावयास लागतो. आत्महत्या करणारे बहुधा भूत अथवा प्रेतात्मा बनून भूक, तहानेने व्याकूळ होऊन फिरत असतात, दु:ख भोगत असतात. तात्पर्य असे आहे की आत्महत्या करणाराची दारूण अधोगती होते.

**प्रश्न**—जर पतिने पत्नीचा त्याग केला तर पत्नीने काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा स्त्रीने आपल्या वडीलाच्या घरीच रहावे. वडीलाच्या घरी राहणे शक्य नसेल तर आपल्या सासरी अथवा माहेरवासीयांच्या जवळ भाड्याचे घर घेऊन रहावे; आणि मर्यादापूर्वक, संयम आणि ब्रह्मचर्यपूर्वक आपल्या धर्माचे पालन करावे; भगवंताचे भजन-स्मरण करावे. वडीलांकडून अथवा पतिकडून जे काही मिळाले असेल त्याच्या साह्याने आपला उदरनिर्वाह करावा. जर अर्थार्जनाचे काही साधन आपल्याजवळ नसले तर पतिगृहीच राहून कातकाम, भरतकाम, विणकाम, दळणकांडण, धुणी-भांडी इत्यादी कामे करून आपला उदरनिर्वाह करावा. असे करणे (स्वावलंबी जीवन जगणे) जरी कठीण असेल तरी तपश्चर्येमध्ये जीवन जगणे देखील कठीण आहे. तप साधनेमध्ये देखील आराम मिळत नाही. या तपश्चर्येमुळे स्त्रीचे आध्यात्मिक तेज वाढेल, तिचे अंत:करण शुद्ध होईल.

माता-पिता, भाऊ-भावजया इत्यादींनीं याकडे विशेष लक्ष द्यावयास पहिजे की, बहीण अथवा मुलगी ह्या "धर्माच्या" मूर्ती आहेत. त्यांचे पालनपोषण करण्याचे विशेष पुण्य मिळत असते. त्यांनी (माता-पिता, भाऊ-भावजय इत्यादींनीं) हे विधान सत्य करून दाखवावे; आचरणात आणावे—***'बिपति काल कर सतगुन नेहा'*** (मानस, किष्किन्धा ७।३)—म्हणजेच संकटकाळी मुलींबाळीवर पूर्वीपेक्षा शंभर पट अधिक प्रेम करावे. जर ते असे करू शकत नसतील, करीत नसतील तर मुलींनी असा विचार करावयास पाहिजे की, जंगलामध्ये राहणाऱ्या प्राण्याचे देखील भगवंत पालन-पोषण करतात, ते काय माझे पालन-पोषण करणार नाहीत. भगवंत तर सर्वांचेच 'नाथ' आहेत तर मग मीच अनाथ कशी असेन! हा विचार दृढपणे धारण करून भगवंतावर भरोसा ठेवून, बेधडक रहावयास पाहिजे. निर्भय, शोकरहित, चिंतारहित, आणि निःशंक होऊन जीवन जगावयास पाहिजे. एक विधवा बहीण होती. तिच्याजवळ उदरनिर्वाहाचे कोणतेही साधन नव्हते. सासरच्या लोकांनी तिच्या अंगावरील दागीने देखील हडप केले. त्यावेळी ती असे म्हणाली की, "मला चिंता कशाची आहे; मला 'दोन' हात आहेत आणि त्यांच्यावर अवलंबून असलेले 'एक' पोट आहे. त्यामुळे मला काळजी करण्याची गरजच काय?'

मुलींनी लहानपणापासूनच कातकाम, विणकाम, भरतकाम, शिवणकाम, शिकणे-शिकाविणे इत्यादी गोष्टी शिकावयास पाहिजेत. विवाह झाल्यानंतर पतिसेवेमध्ये मुळीच अंतर पडू देऊ नये. अंतःकरण्यामध्ये मात्र भरवसा भगवंतावरच पाहिजे. कारण 'खरा आधार' भगवंताचाच आहे; असा आधार पतिचा; पुत्राचा अथवा स्वतःच्या शरीराचा देखील नाही—हे अगदी त्रिकालाबाधित सत्य

आहे. त्यामुळे पतिने आपला त्याग केला तरी पत्नीने घाबरून जाऊ नये. आपल्यामध्ये जर कांही उणिवा असतील तर दुरूस्त कराव्यात, (सुधाराव्यात.) आणि उणिवा नसतील तर बेधडक होऊन जीवन जगावे. आपल्या भावना आणि आचरण शुद्ध नसेल तरच आपले अंतःकरण दुर्बल बनत असते. आपल्या भावना आणि आचरण शुद्ध असेल तर आपले अंतःकरण दुर्बल होण्याचा प्रश्नच येत नाही. म्हणून आपले आचरण आणि भावना नेहमी शुद्ध आणि पवित्र ठेवून भगवंताचे भजन-स्मरण करावे. भगवंतावर भरवसा ठेवून कोणत्याही गोष्टीची मुळीच काळजी करू नये.

पुरुषांनी (आजकालच्या युवकांनी) स्त्रीयांचा कधीही त्याग करू नये. स्त्रीचा त्याग करणे हे महापाप आहे. घोर अन्याय आहे. असे करणारे भयंकर दुर्गतीला प्राप्त होतात, दारूण नरकामध्ये जातात.

**प्रश्न**—पुरुष पुनर्विवाह करू शकतो काय?

**उत्तर**—जर पहिल्या पत्नीपासून संतान उत्पती झाली नाही तर पितृऋणातून मुक्त होण्याकरीता—केवळ संतती करीता—पुरुष शास्त्राज्ञेनुसार दुसरा विवाह करू शकतो. आपल्या सुखोपभोगाकरीता पुरूष दुसरा विवाह करू शकत नाही. कारण आपणाला प्राप्त झालेले हे मनुष्य शरीर स्वतःच्या सुखोपभोगाकरीता मिळालेलेच नाही.

पुनर्विवाह आपल्या पहिल्या पत्नीच्या संमतीनेच करावा; आणि पत्नीने देखील पितृऋणातून मुक्त होण्याकरीता पतिला पुनर्विवाह करण्याची संमती द्यावी. पुनर्विवाह केल्यानंतर पतिने आपल्या पहिल्या पत्नीचा अधिकार सुरक्षित ठेवावा. तिचा तिरस्कार अथवा अनादर न करता तिला जेष्ठ पत्नी समजून सन्मानाची वर्तणूक द्यावी.

ज्याला संतती झाली, परंतु पत्नी मरण पावली त्याला पुनर्विवाह करण्याची आवश्यकता नाही, कारण त्याची पितृऋणातून मुक्तता झाली आहे. परंतु ज्याची भोगासक्ती नष्ट झालेली नाही तो पुनर्विवाह करू शकतो. कारण जर तो पुनर्विवाह करणार नाही तर तो व्यभिचार करेल, वेश्यागमन करेल त्यामुळे त्याला भयंकर पाप लागेल. म्हणून या पापापासून वाचण्याकरीता, आणि मर्यादेमध्ये राहण्याकरीता शास्त्राज्ञेनुसार पुरुषाने पुनर्विवाह करावा.

**प्रश्न**—पूर्वीच्या काळी राजे-महाराजे अनेक विवाह करीत असत; तर असे करणे योग्य होते काय?

**उत्तर**—आपल्या सुखोपभोगाकरीता अनेक विवाह करणारे राजे-महाराजे आदर्श मानल्या गेले नव्हते. केवळ 'राजा' असेल तर तो इतरांकरीता आदर्श ठरू शकत नाही. जे राजे शास्त्राज्ञेनुसार वर्तन करीत होते, धर्माचे पालन करीत होते तेच राजे 'आदर्श' मानल्या गेले आहेत.

वास्तविक दृष्ट्या विवाह करणे ही काही फार महत्त्वाची, अथवा उच्च दर्जाची गोष्ट नाही. आणि आवश्यक देखील नाही. आवश्यक तर केवळ परमात्मप्राप्ती करणे हेच आहे. मनुष्यशरीर केवळ परमात्मप्राप्ती करून घेण्याकरीता मिळाले आहे. विवाह करण्याकरीता नाही. स्त्री-पुरुषांचे (नर-मादीचे) मिलन तर देवतापासून ते भूत-प्रेत इत्यादीपर्यंत स्थावर-जंगम प्रकारच्या प्रत्येक योनीमध्ये घडून येत असते. त्यामुळे ही काही महत्त्वाची गोष्ट नाही. परंतु परमात्मप्राप्तीची संधी, अधिकार योग्यता इत्यादी मनुष्यजन्मामध्येच आहे. मनुष्याला परमात्मप्राप्तीचा जन्मसिद्ध अधिकार आहे. जे विवेकाच्या योगाने आपल्या ठिकाणी असलेल्या विषयासक्तीला, भोगासक्तीला नष्ट करू शकत नाहीत अशा कमजोर व्यक्तीकरीताच विवाह करण्याविषयीचे

विधान केल्या गेलेले आहे. भोग भोगून त्यांच्यापासून विरक्त होण्याकरीता, भोगांविषयी नावड उत्पन्न होण्याकरीताच गृहस्थाश्रमाचा स्विकार करावयास पाहिजे. जे विषयासक्ती नष्ट करू शकत नाहीत त्यांच्यावरच पितृऋण राहत असते; म्हणजेच उपकुर्वाण ब्रम्हचाऱ्यावरच वंश-परंपरा पुढे चालू ठेवण्याची जबाबदारी असते नैष्ठिक ब्रम्हचाऱ्यावर आणि भगवद्भक्तावर नसते. तात्पर्य असे आहे की, जो आपली भोगासक्ती नष्ट करू शकला नाही अशाच पुरुषावर पितृऋण राहत असते. ज्यांच्या ठिकाणी भोगासक्ती नाही त्यांच्यावर कोणत्याही प्रकारचे ऋण नसते, मग ते ज्ञानयोगी, कर्मयोगी, भक्तीयोगी अथवा कोणीही असोत. कारण उत्पादनावरच आयकर लागेल, मालवरच जकात कर लागेल; ज्यांच्या जवळ कोणत्याही प्रकारचे उत्पादनच नाही त्यांच्यावर आयकर कशाबद्दल लागेल ? ज्यांच्याजवळ मालच नाही त्यांना जकात कर देण्याची गरजच काय ?

**प्रश्न**—स्त्री पुनर्विवाह का करू शकत नाही ?

**उत्तर**—माता पित्याने एकवेळ आपल्या कन्येचे कन्यादान केल्यानंतर तिला आता 'कन्या' ही संज्ञा राहणार नाही. त्यामुळे तिचे पुन्हा दान कसे करता येईल. आता तिचा पुनर्विवाह करणे हा पशुधर्मच' आहे. दुसरी गोष्ट अशी आहे की पितृऋण हे पुरुषांवर असते, स्त्रियांवर नाही.

**सकृदंशो निपतति सकृत् कन्या प्रदीयते।**
**सकृदाह ददानीति त्रीण्येतानि सतां सकृत्॥**

(मनुस्मृति ९। ४७, महा वन २९४। २६)

कुटुंबामध्ये संपत्ती इत्यादींची वाटणी एक वेळच होते, मुलगी एकच वेळ दिल्या जाते आणि मी देतो—हे वचनसुद्धा एकच वेळ दिल्या जाते सत्पुरुषांचे हे तीन्हीं काम एकच वेळ होतात.

शास्त्रीय, धार्मिक, शारीरिक आणि व्यावहारिक—या चारही दृष्टीकोनातून पाहिले तर स्त्रीचा पुनर्विवाह करणे अनुचित आहे. शास्त्रीय दृष्टीकोनातून पाहिले तर शास्त्रामध्ये स्त्रीला पुनर्विवाह करण्याची आज्ञा दिलेली नाही. धार्मिक दृष्टीकोनातून पाहिले तर स्त्रीवर पितृऋणादी कोणत्याही प्रकारचे ऋण नसते. शारीरिक दृष्टीने विचार केला तर स्त्रीच्या ठिकाणी 'काम' शक्तीला रोखून ठेवण्याची ताकत आणि मनोबल असते. व्यावहारिक दृष्टीकोनातून विचार केला तर पुनर्विवाह केल्यानंतर त्या स्त्रीच्या अगोदरच्या संततीने कोठे जावे? त्यांचे पालनपोषण कोण करेल? कारण ती स्त्री ज्या पुरुषासोबत विवाह करेल तो पुरुष त्या संततीचा स्विकार करणार नाही. म्हणून स्त्री जातीने पुनर्विवाह न करता ब्रम्हचर्यव्रताचे पालन करून संयमपूर्वक जीवन जगावे.

शास्त्रामध्ये तर असेही सांगितले आहे की ज्या स्त्रीला पांच-सात मुले झाली आहेत अशी स्त्री देखील जर पतिच्या मृत्युनंतर ब्रम्हचर्यव्रताचे पालन करीत असेल तर ती नैष्ठिक ब्रम्हचाऱ्यांच्या गतीला प्राप्त होते. तर मग स्त्रीला कोणत्याही प्रकारचे संतान झालेले नाही अशी पति निधनानंतर जर ब्रम्हचर्यव्रताचे पालन करीत असेल तर ती नैष्ठिक ब्रम्हचाऱ्यांच्या गतीला प्राप्त होईल हे वेगळे सांगण्याची आवश्यकताच काय?

**प्रश्न**—जर तरुण स्त्री विधवा झाली तर तीला काय करावयाला पाहिजे?

**उत्तर**—जीवित अवस्थेत पती ज्या गोष्टींना चांगले मानत होते आणि ज्या गोष्टी अनुकूल होत्या, मृत्युपावल्यानंतर सुद्धा विधवा स्त्रीने त्यानुसार ही आचरण करायला पाहिजे तीने अशी मान्यता करावी भगवंतानीं जी प्रतिकूलता दिली ती माझ्या तपस्याकरिता आहे. आपल्या मनाने केलेल्या तपापेक्षा ही तपस्या श्रेष्ठ आहे.

भगवंताच्या विधानाप्रमाणे केलेले तप, संयमाची फारच महिमा आहे. असा विचार करून मनात फारच उत्साह ठेवला पाहिजे की मी कशी भाग्यशाली आहे मला अशी तपाची संधि मिळाली आहे.

भागवतात येते—

**तत्तेऽनुकम्पां सुसमीक्षमाणो भुञ्जान एवात्मकृतं विपाकम्।**
**हृद्वाग्वपुर्भिर्विदधन्नमस्ते जीवेत यो मुक्तिपदे स दायभाक्॥**

जो माणूस प्रतिक्षण फार उत्सुकतेने आपल्या कृपेचा चांगल्या प्रकारे अनुभव करित राहतो आणि प्रारब्धानुसार जे काही सुख किंवा दुःख प्राप्त होते त्याला. निर्विकाररुपाने भोगतो आणि जो प्रेमपूरित हृदय गद्गद वाणी आणि रोमांचित शरीराने आपल्याला तुमच्या चरणावर समर्पित करित राहतो—याप्रमाणे जीवन व्यतीत करणारा मनुष्य आपल्या परमपदाचा अधिकारी होतो ज्या प्रमाणे पित्याच्या सम्पतिचा अधिकारी पुत्र!

विधवा स्त्रीने आपल्या चरित्राची विशेष रक्षा करावयाला हवी. जर व्यभिचार करिल तर ती आपल्या दोन्ही कूळानां कलंकित करिल. मर्यादेच्या नाश करण्यामुळे मृत्युनंतर घोर नरकात जाईल. म्हणून तीने मर्यादा पाळावी धर्मविरुद्ध कोणतेच काम करु नये. माता कुन्तीप्रमाणे आपल्या वैधव्य-धर्माचे पालण करावे. माता कुन्तीला आठवल्याने धर्मपालनाचे विशेष बळ मिलते.

**प्रश्न**—जर स्त्री तारूण्यावस्थेत विधवा झाली तिने काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा स्त्रीने मर्यादामध्ये जीवन जगावयास पाहिजे. माता कुंतीप्रमाणे तिने आपल्या वैधव्यधर्माचे पालन करावयास पाहिजे. माता कुंतीचे स्मरण केल्यास स्त्रीला आपल्या धर्माचे पालन करण्याविषयीचे बल प्राप्त होत असते.

तिने चारित्र्यभ्रष्ट होऊ नये. जर ती आपले चारित्र्यरक्षण करण्यास असमर्थ असेल तर जागोजागी भटकून व्यभिचार केल्यापेक्षा तिने कोणत्याही एका पुरुषासोबत संबंध प्रस्थापित करून त्याच्याच संरक्षणामध्ये रहावयास पाहिजे. जरी ही कोणतीही विधि अथवा शास्त्रविधान नाही तरीही जागोजागी भटकून व्यभिचार करीत फिरण्यापेक्षा एका जागी स्थिर होणे योग्य आहे. कारण व्यभिचारी स्त्री आपल्या दोन्ही वडील कुलांना कलंकित करीत असते, मर्यादेचा नाश करीत असते आणि मृत्युनंतर घोर नरकामध्ये जात असते.

**प्रश्न**—आजकाल स्त्रीयांना पुरुषाप्रमाणेच समान अधिकार देण्याविषयी चर्चा केली जात आहे? हे योग्य आहे काय?

**उत्तर**—हे योग्य नाही. वास्तविक स्त्रीला 'समान' अधिकार नसून 'विशेष' अधिकार आहे, कारण ती आपल्या पित्याच्या घराचा त्याग करून पतिच्या घरी आलेली आहे; त्यामुळे घरामध्ये तिला विशेष अधिकार असतो. तिला घरवाली, मालकीण, कारभारीन, इत्यादी विशेषणांनी संबोधिले जाते. घराबाहेर पतिचा विशेष अधिकार असतो.

ज्याप्रमाणे रथ दोन चाकावर चालतो परंतु दोन्ही चाके अलग-अलग ठिकाणी लावलेली असतात. जर दोन्ही चाके एकाच ठिकाणी लावली तर रथ कसा चालणार? ज्याप्रमाणे दोन चाके वेगवेगळ्या ठिकाणी असतील तरच रथ चालतो त्याप्रमाणे पती आणि पत्नीचे आपापले वेगवेगळे अधिकार असतील तरच 'घर' चालत असते. जर समान अधिकार दिल्या गेले तर स्त्री प्रमाणे पुरुष गर्भधारण करू शकेल काय? म्हणून आपापले अधिकारच समान अधिकार आहेत. दोघानांही आपल्या अधिकाराविषयी पूर्णपणे स्वातंत्र्य आहे.

आपापला अधिकारच श्रेष्ठ आहे; उत्तम आहे. आम्हाला कमी आणि पुरुषांना जास्त प्रमाणात अधिकार दिलेले आहे—या भावनेपोटीच

अंतःकरणामध्ये अशी वासना राहते की, आम्हाला समान अधिकार मिळावेत; पूर्ण अधिकार मिळावेत. या वासनेची मूळ कारणे आहेत—समजूतदारपणा नसणे आणि मूर्खपणा. समजूतदारपणा असेल तर थोडासा देखील अधिकार उत्तम वाटावयास लागतो. अधिकारापेक्षा कर्तव्याला जास्त महत्त्व द्यावयास पाहिजे. अधिकार हा कर्तव्याचा दास आहे; कर्तव्य हे अधिकाराचे दास नाही. जर आपल्या अधिकारचे तत्परतेने पालन केल्या जाईल तर जग, संत-महात्मे, शास्त्रे आणि परमेश्वर—हे सर्व तुम्हाला अधिकार प्रदान करतील.

अधिकार प्राप्त करण्याची इच्छा हीच जन्म-मरणाचे कारण आहे; नरकामध्ये नेणारी आहे. आपण पाहिले आहे की जेंव्हा एका गल्लीतील कुत्रा दुसऱ्या गल्लीमध्ये जातो तेव्हा त्या गल्लीतील कुत्रा त्या कुत्र्यावर हल्ला करतो. दोन्ही कुत्रे आपसात भांडतात. बाहेरून येणारा कुत्रा जर खाली पडून पाय वर करेल आणि नम्रपणा धारण करेल तर त्या गल्लीतील कुत्रा त्याच्या पोटावर ऊभा राहून त्याची हार स्विकार करतो व त्याला सोडून देतो. कारण तो त्या गल्लीवर स्वतःचा अधिकार मानत असतो. आगन्तुक कुत्रा त्याच्यासमोर आपली हार मान्य करीत असेल तर, त्याच्या समोर नम्रता धारण करीत असेल तर त्यांच्यामधील भांडण संपते. यावरून असे सिद्ध होते की, जास्तीचे अधिकार मिळविण्याची लालसा (वासना) तर कुत्र्याच्याही ठिकाणी दिसून येते. जर अशीच लालसा मनुष्याच्याही ठिकाणी असेल तर त्याच्या ठिकाणी माणुसकी कोठे राहिली? अधिक प्रमाणात अधिकार बळकावण्याची लालसा नीच वृत्तीच्या मनुष्याच्या ठिकाणीच दिसून येते. जे श्रेष्ठ पुरुष असतात ते आपल्या कर्त्तव्याचेच पालन तत्परतेने करतात; त्यामुळेच त्यांचा अधिकार आपोआपच उच्च प्रतिचा होऊन जातो.

वास्तविक दृष्ट्या पाहिले तर स्त्रियांचा देखील अधिकार

मुळीच कमी नाही. त्यांना मालकीण, गृहलक्ष्मी, कारभारीन इत्यादी विशेषणांनी संबोधिले जाते. घरामधील जेवढे लोक बाहेर काम करतात ते घरी आल्यानंतर स्त्रीयांचाच आश्रय घेतात. स्त्रीया घरामधील संपूर्ण प्राण्यांना आश्रय देणाऱ्या असतात. त्या सर्वांची सेवा करीत असतात; सर्वांचे पालन करीत असतात. त्यामुळे त्यांचाच अधिकार जास्त आहे. परंतु जेंव्हा त्या आपले कर्तव्य विसरतात तेंव्हा त्यांच्या मनांत जास्तीचे अधिकार बळकावण्याविषयी लालसा उत्पन्न होते.

**प्रश्न**—आजकाल या महागाईच्या जमान्यामध्ये स्त्री देखील नोकरी करून अर्थार्जन करीत असेल तर काय हरकत आहे.

**उत्तर**—स्त्रीचे अंतःकरण कोमल असते. त्यामुळे ती नोकरीमधील त्रास, हेवादावा, तिरस्कार इत्यादी सहन करू शकत नाही. थोडेसे जरी वाईट अथवा मनाविरूद्ध घडले तर तिच्या डोळ्यात अश्रू येतात नोकरीला तुम्ही गुलामी म्हणा; दास्यत्व म्हणा; तुच्छता म्हणा—सर्व विधाने (गोष्टी) सारखीच आहेत. गुलामगीरीमधील दुःख पुरुष सहन करू शकतो परंतु स्त्री सहन करू शकत नाही. त्यामुळेच नोकरी, शेती, व्यापार इत्यादी कामांची जबाबदारी पुरुषांवर आहे; आणि घरकामाची जबाबदारी स्त्रियांवर आहे. म्हणून स्त्रियांची प्रतिष्ठा, आदर, गृहकाम करण्यामध्येच आहे. घराबाहेरील काम करण्यामध्ये स्त्रियांचा तिरस्कारच सामावलेला आहे. जर स्त्री प्रतिष्ठा सांभाळून द्रव्यार्जन करीत असेल तर काही हरकत नाही. म्हणजेच स्त्री आपल्या घरीच राहून उदरनिर्वाहाला मदत करू शकते. जसे की, स्वेटर इत्यादी विणणे; कपडे शिवणे; भरतकाम, चित्रकला; चित्रे रंगविणे; देवतांची चित्रे सजविणे इत्यादी. असे केल्याने ती कोणाची ही गुलाम राहणार नाही; पराधीन राहणार नाही.



# ६. महापापापासून सावधान!

**ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं गुर्वंगनागमः।**
**महान्ति पातकान्याहुः संसर्गश्चापि तैः सह॥**

(मनुस्मृति ११।५४)

'ब्राम्हणाची हत्या करणे, मदिरा पान करणे; सुवर्णादिची चोरी करणे आणि गुरूपत्नीसोबत व्यभिचार करणे—ही चार प्रकारची महापापे आहेत. या चार महापापा—पैकी कोणत्याही प्रकारचे पाप करणाऱ्या व्यक्तीसोबत जो तीन वर्षे राहतो (संगत करतो) त्याला देखील तेच फळ मिळते की जे फळ त्या महापाप्याला मिळत असते.*

## १. ब्रह्महत्या

'ब्राम्हण' वर्ण हा चारही वर्णांचा गुरू आहे—'**वर्णानां ब्राह्मणो गुरुः**' शास्त्रज्ञान प्रकाशित करण्याचा, जतन करून ठेवण्याचा प्रयत्न जितका ब्राम्हणांनी केला आहे तितका इतर कुणीही केला नाही. त्यामुळे ब्राम्हणांची हत्या करणे हे महापाप आहे. तसेच जगाचे कल्याण करणाऱ्या पुरुषाला, भगवत्-भक्ताला, आणि गायीसारख्या पवित्र प्राण्यांना मारणे हे देखील महापाप आहे. कारण ज्याच्या योगाने इतराचे जितके अधिक कल्याण होत असते त्याच्या हत्येमुळे तितकेच अधिक पाप लागते.

## २. मदिरापान

मांस, अंडी, चरस, तंबाखू, भांग इत्यादी सर्व प्रकारच्या अशुद्ध आणि मादक पदार्थांचे सेवन करणे पाप आहे. परंतु

---

* स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबँश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वार: पंचमश्चाचरँ स्तैरिति॥ (छान्दोग्य ५।१०।९)

मदिरा प्राशन करणे हे महापाप आहे. मदिरापानामुळे मनुष्याच्या अंत:करणातील धार्मिक भावना, धर्माविषयीची आवड, सुसंस्कार पूर्णपणे नष्ट होतात. त्यामुळे मनुष्याची वाटचाल अधोगतीच्या दिशेने सुरू होते.

मदिरा (दारू) तयार करतांना अगणित जीवांची हत्या होत असते. गंगा नदी सर्वांना शुद्ध करणारी आहे परंतु दारू ठेवण्याचे भांडे गंगेमध्ये टाकले तर ते शुद्ध होत नाही, जर मदिरापात्र इतके अशुद्ध आहे तर दारू पिणारा मनुष्य किती अशुद्ध होत असेल—याची कल्पनाच न केलेली बरी. मुस्लीम धर्मामध्ये तर मी असे ऐकले आहे की—"शरीराच्या ज्या भागावर दारूचा स्पर्श झाला असेल, तेथील चामडी कापून फेकून द्यावी."

**प्रश्न**—आजकाल अनेक प्रकारच्या औषधामध्ये दारूचे मिश्रण केलेले आढळते. जर शरीर स्वास्थ्याकरीता औषधी रूपाने त्याचे सेवन केले तर महापाप लागेल काय?

**उत्तर**—दारूमिश्रित औषधांच्या सेवनामुळे महापाप लागणारच.

**प्रश्न**—जर कुटुंबामधील एखादी व्यक्ती मद्यपान करीत असेल तर त्याच्या संगतीदोषाचे पाप इतरांना लागेल काय?

**उत्तर**—असे होणार नाही. कुटुंबाच्या दृष्टीने तो परिवारातील एक सदस्य आहे. त्यामुळे ते त्या मद्यपीची संगत करीत आहेत असे म्हणता येणार नाही. निरूपाय होऊन त्यांना त्या मद्यपीसोबत रहावे लागते. जर एखाद्या स्त्रीचा पती दारू पीत असेल, आणि त्या स्त्रीला नेहमी पतिसोबत रहावे लागते, तिला मद्यपीच्या संगतीचा दोष लागणार नाही, कारण ती नाईलाजास्तव पतिसोबत राहत असते. मनापासून, नावडीने दुर्वासनी व्यक्तीची संगत केली तर कुसंगतीचा दोष लागत नाही.

**प्रश्न**—पूर्वी ज्यांनी जाणूनबुजून मद्यपान केले नसेल; कांही कारणास्तव मद्यपान केल्या गेले असेल; आणि त्यांना आपली चूक कळून आली असेल तर ते मद्यपानापासून होणाऱ्या महापापापासून कसे शुद्ध होऊ शकतील ?

**उत्तर**—जर अशा प्रकारचे व्यक्ती मनापासून पश्चाताप करून दारू पिणे सोडून देतील आणि 'मी भाविष्यकाळात यापुढे मुळीच दारू पिणार नाही' असा निश्चय करतील तर त्यांना पूर्वी केलेल्या मद्यपानाचे पाप लागणार नाही. कारण जीव (आत्मा) नित्य-निरंतर शुद्धच आहे—***'चेतन अमल सहज सुखरासी'*** त्यामुळे अशुद्धीचा त्याग करताच त्यांना नित्यप्राप्त शुद्धी प्राप्त होईल.

## ३. चोरी

कोणत्याही वस्तुची चोरी करणे हे पाप आहे; परंतु सोने, हिरे यासारख्या मौल्यवान वस्तुंची चोरी करणे हे महापाप आहे. तात्पर्य असे आहे की जी वस्तु जितकी अधिक मौल्यवान असेल, त्या वस्तुची चोरी केल्यामुळे तितकेच अधिक पाप लागेल.

## ४. गुरुपत्नीगमन

वीर्य-(ब्रम्हचर्य) नाशाचे जे अनेक प्रकार आहेत ते सर्व पापरूपच आहेत* परंतु गुरुपत्नीगमन करणे हे महापाप आहे. कारण आपणाला सर्व प्रकारची विद्या शिकविणारे, आपल्या जीवनाला तेजोमय बनविणारे गुरूची पत्नी आपल्या आईपेक्षाही श्रेष्ठ आहे; त्यामुळे गुरू पत्नीसोबत व्यभिचार करणे हे महापाप आहे.

* वीर्याच्या एका थेंबामध्ये हजारों 'जीव' असतात. स्त्री-संभोगामध्ये जे वीर्य नष्ट होते त्यामधी पूं-बीजाचे स्त्रीच्या गर्भाशयामधील डिंबपेशीसोबत मिलन होऊन 'गर्भ'

परस्त्रीगमन करणे हे देखील महापाप आहे. म्हणून त्याला व्यभिचार म्हणजेच विशेष अभिचार (हिंसा) असे म्हटले गेले आहे. जर पुरुष परस्त्रीगमन करीत असेल अथवा स्त्री परपुरुषगमन करीत असेल तर त्यांच्या कुटंबीयांना अत्यंत दुःख होत असते. स्त्री व्यभिचारी असेल तर तिच्या दोन्हीकडच्या कुलांना दोष लागतो. अशा रितीने दोन्ही कुलांना दुःख देणे महापाप आहे. निषिद्ध भोग भोगून शास्त्र, समाज, कुल, इत्यादीची मर्यादा उल्लंघन करणे हे महापाप आहे. ही दोन्ही प्रकारची (दोन्हीकडील कुलांना दुःख देणे आणि शास्त्रादिची मर्यादा उल्लंघन करणे) पापे एकाच वेळी घडून येत असल्यामुळे व्यभिचाराला 'महापाप' असे म्हणतात. एका बुद्धीवान सत्पुरूषाने आपला अनुभव सांगितला होता की—परस्त्री-गमन केल्यामुळे आपल्या हृदयामधील आस्तिकभाव नष्ट होतो आणि नास्तिकभाव उत्पन्न होतो. नास्तिकभाव उत्पन्न होणे हे महान अनर्थाचे मूळ आहे.

हिन्दू, मुसलमान, ख्रिस्ती इत्यादी सर्व प्रकारच्या व्यक्तिंनी अशा प्रकारच्या महापापांचा त्याग करावयास पाहिजे. मनुष्यदेहाची

---

तयार होत असतो; आणि बाकीचे 'जीव' मरून जातात; त्यांची हिंसा केल्याचे पाप लागते. परंतु केवळ प्रजानिर्मितीच्या उद्देशानें केवळ ऋतुकाळीच स्त्रीसंभोग केल्यामुळे पाप लागत नाही. (पाप होते परंतु ते लागत नाही.) कारण ते कृत्य शास्त्राज्ञेनुसार, धर्माज्ञेनुसार होत असते—'**स्वभावनियतं कर्म कुर्वन्नाप्नोति किल्बिषम्**' (गीता १८। ४७); '**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि**' (गीता ७। ११) ; परंतु केवळ भोगेच्छा मनात ठेवून स्त्रीसंभोग केल्यामुळे त्या 'जीवांच्या' हिसेंचे पाप लागते. म्हणूनच म्हटले आहे—

**एक बार भग भोग ते, जीव हतै नौ लाख।**
**जन मनोर नारी तजी, सुन गोरख की साख॥**

प्राप्ती झाली आहे त्यामुळे कमीतकमी महापापापासून स्वतःला वाचवावयास पाहिजे म्हणजे अधोगती होणार नाही; भूत-प्रेतादी योनींची प्राप्ती होणार नाही.

**गर्भपात हे महापापापेक्षा दुप्पट पाप आहे—**

ज्याप्रमाणे ब्रम्हहत्या करणे हे महापाप आहे, त्याप्रमाणे गर्भपात करणे हे देखील महापाप आहे. शास्त्रामध्ये गर्भपाताला महापापापेक्षा 'दुप्पट पाप' असे म्हटले आहे—

**यत्पापं ब्रह्महत्याया द्विगुणं गर्भपातने।**
**प्रायश्चित्तं न तस्यास्ति तस्यास्त्यागो विधीयते॥**

(पाराशरस्मृति ४। २०)

'ब्रम्हहत्येमुळे लागणाऱ्या पापापेक्षा दुप्पट पाप गर्भपात केल्यामुळे लागते. या गर्भपातरूपी महापापाला कोणत्याही प्रकारचे प्रायश्चित्त सांगितले नाही; याविषयी तर गर्भपात केल्यापेक्षा त्या स्त्रीचा त्यागच करण्याचे' विधान करण्यात आले आहे.

भगवंत विशेष कृपा करून जीवाला मनुष्यशरीर प्रदान करतात, परंतु नसबंदी, गर्भपात करून अथवा निरोध, लूप, गर्भनिरोधक गोळ्या इत्यादी संततीप्रतिबंधक साधने वापरून जीवाला मनुष्यशरीर प्राप्तच होऊ न देणे, जन्म घेण्यापूर्वीच त्याला नष्ट करणे, हे घोर पाप आहे. गर्भाने कोणत्याही प्रकारचा अपराध केलेला नसतो तरी देखील त्या दुर्बळ जीवाची हत्या करणे हा त्यासोबत होणारा किती घोर अन्याय आहे. तो जीव जर कदाचित जन्माला येईल तर किती चांगली कामे करील, समाजाची सेवा करील, स्वतःचा देखील उद्धार करून घेईल; परंतु जन्माला येण्यापूर्वीच त्याची हत्या करणे हा घोर अन्याय आहे, महाभयंकर पाप आहे. स्वतःचा उद्धार, कल्याण न करून घेणे हा देखील दोष आहे, पाप आहे; तर मग दुसऱ्यांना देखील

आपल्या उद्धाराची संधी प्राप्त न होऊ देणे हे किती भयंकर पाप आहे. अशा महापापी स्त्रीपुरुषांना पुढील जन्मामध्ये कोणत्याही प्रकारची संतती प्राप्त होणार नाही. ते निपुत्रिक राहून जन्मो– जन्मी पश्चाताप करीत राहतील.

ही गोष्ट प्रत्यक्ष सिद्ध झालेली आहे की जे मालक चांगल्या नोकरांचा तिरस्कार करतात त्यांना चांगले नोकर मिळणार नाहीत. आणि जे नोकर चांगल्या मालकांचा तिरस्कार करतात त्यांना चांगले मालक मिळणार नाहीत. संत, महात्म्याची संगती प्राप्त होऊन देखील जे लोक आपला ऊद्धार करून घेणार नाहीत त्यांना नंतर सत्संगती प्राप्त होणार नाही. ज्यांच्यापासून आपले कल्याण झालेले आहे अशा चांगल्या संतांचा जे लोक त्याग करतात, त्यांची निंदा आणि तिरस्कार करतात त्यांना तसे चांगले संत पुन्हा मिळणार नाहीत. ज्याप्रमाणे आईवडील लहान मुलावर प्रसन्न होऊन त्यांना मिठाई देतात, परंतु लहान मुलाने ती मिठाई न खाता तिला घाणेरड्या नालीमध्ये फेकून दिली तर आईवडील त्याला पुन्हा मिठाई देणार नाहीत; त्याप्रमाणे भगवंत विशेष कृपा करून मनुष्य–शरीर प्रदान करतात, परंतु मनुष्य त्या शरीराच्या योगाने पाप करतो, त्या शरीराचा दुरूपयोग करतो (करेल) तर त्याला पुन्हा मनुष्य–शरीर मिळणार नाही. आईवडील तर अज्ञानी मुलाला पुन्हा मिठाई देतील परंतु जे (मोठी माणसे) जाणूनबुजून पाप करतात त्यांना भगवंत मनुष्य–शरीर पुन्हा देणार नाहीत. अशा प्रकारे जे गर्भपाताचे पाप करतात त्यांना पुढील जन्मामध्ये संतती प्राप्त होणार नाही.

ब्रम्हवैवर्तपुराणामध्ये (प्रकृतिखण्ड, अध्याय २ मध्ये) वर्णन आलेले आहे की, सृष्टीच्या आरंभी, भगवान श्रीकृष्णाची चिन्मयी शक्ती असलेल्या मूळ प्रकृतिने (श्रीराधेने) आपल्या

गर्भाला ब्रम्हांड गोलकाच्या अथांग पाण्यामध्ये फेकून दिले हे पाहून भगवंतानी तिला शाप दिला की आजपासून पुढे तुला कोणत्याही प्रकारची संतती प्राप्त होणार नाही. इतकेच नाही तर तुझ्या अंशापासून ज्या दिव्य स्त्रिया उत्पन्न होतील त्यांना सुद्धा कोणत्याही प्रकारची संतती प्राप्त होणार नाही,* त्यानंतर मूळ प्रकृतिच्या जीभेच्या अग्रभागापासून सरस्वती प्रगट झाली. त्यानंतर काही वेळाने ती मूळ प्रकृती दोन रूपामध्ये प्रगट झाली. शरीराच्या डाव्या भागाकडून ती 'लक्ष्मी' आणि उजव्या भागाकडून ती 'राधा' बनली. भगवान श्रीकृष्ण देखील त्यावेळी दोन रूपामध्ये प्रगट झाले. शरीराच्या डाव्या भागाकडून ते 'चतुर्भुज विष्णु' आणि उजव्या भागाकडून ते 'द्विभुज कृष्ण' झाले † तेंव्हा भगवान श्रीकृष्णाने लक्ष्मी आणि सरस्वती या दोन्हीही देवींना विष्णुची सेवा करण्याची आज्ञा दिली. मूळ प्रकृतिपासून प्रगट

---

* दृष्ट्वा डिम्बंच सा देवी हृदयेन विभूषिता।
उत्ससर्ज च कोपेन ब्रह्माण्डं गोलके जले॥
दृष्ट्वा कृष्णश्च तत्त्यागं हाहाकारं चकार ह।
शशाप देवीं देवेशस्तत्क्षणं च यथोचितम्॥
यतोऽपत्यं त्वया त्यक्तं कोपशीले सुनिष्ठुरे।
भवत्वमनपत्यापि चाद्यप्रभृति निश्चितम्॥
या यास्त्वदंशरूपा च भविष्यन्ति सुरस्त्रियः।
अनपत्याश्च ताः सर्वास्तत्समा नित्ययौवनाः॥

(प्रकृति २। ५०—५३)

† अथ कालान्तरे सा च द्विधारूपा बभूव ह।
वामार्द्धांगा च कमला दक्षिणार्द्धा च राधिका॥
एतस्मिन्नन्तरे कृष्णो द्विधारूपो बभूव ह।
दक्षिणार्द्धश्च द्विभुजो वामार्द्धश्च चतुर्भुजः॥

(प्रकृति० २। ५६-५७)

झालेल्या असल्यामुळे लक्ष्मी आणि सरस्वतींना देखील कोणत्याही प्रकारच्या संततीची प्राप्ती झाली नाही.* त्यानंतर भगवान श्रीकृष्णाच्या रोममूलापासून असंख्य 'गोप' प्रगट झाले आणि श्रीराधेच्या रोममूलापासून असंख्य 'गोपिका' प्रगट झाल्या. भगवंताच्या शापवाणीमुळे या गोपिकांना देखील कोणत्याही प्रकारच्या संततीची प्राप्ती झाली नाही† या कथेवरून असे सिद्ध होते की, जी स्त्री गर्भपात करते ती भावी जन्मामध्ये संततीचे सूख पाहू शकत नाही.

**प्रश्न**—समाजामध्ये असेही पहावयास मिळते की, ज्या स्त्रियांनी गर्भपात केला आहे त्या स्त्रीया पुन्हा देखील गर्भवती राहतात, त्यांना संततीची प्राप्ती होते. त्यांच्या संततीलाही संततीची प्राप्ती होते, तर मग गर्भपात करणाऱ्या स्त्रियांना पुन्हा संततीची प्राप्ती होत नाही हे विधान कसे काय मान्य करावे?

**उत्तर**—या जन्माचे प्रारब्ध तर अगोदरच बनलेले आहे; त्यामुळे गर्भपाती स्त्रियांना पूर्व प्रारब्धानुसार संततीची प्राप्ती होऊ शकते. परंतु या जन्मामधील क्रिया कर्मांनुसार पुढील जन्माकरीता नवीन प्रारब्ध बनल्यानंतर पुढील जन्मामध्ये त्यांना संततीची प्राप्ती होणार नाही. या जन्मामध्ये केलेल्या गर्भपातरूपी महापापाचे फळ त्यांना पुढील जन्मामध्ये भोगावे लागणारच!

---

* अनपत्ये च ते द्वे च यतो राधांशसम्भवाः।

(प्रकृति० २। ६०)

† राधांगलोमकूपेभ्यो बभूवुर्गोपकन्यकाः।
राधातुल्याश्च सर्वास्ताः राधातुल्याः प्रियंवदाः॥
रत्नभूषणभूषाढ्याः शश्वत् सुस्थिरयौवनाः।
अनपत्याश्च ताः सर्वाः पुंसः शापेन सन्ततम्॥

(प्रकृति० २। ६४-६५)

**प्रश्न**—गर्भस्राव, गर्भपात, आणि गर्भहत्या—या तीन क्रियामध्ये काय फरक आहे?

**उत्तर**—गर्भामध्ये 'जीवाचे' शरीर बनण्याच्या पूर्वी रज-वीर्य पडून जात असेल तर त्याला 'गर्भस्राव' असे म्हणतात. जेंव्हा गर्भामध्ये शरीर तयार होणे सुरू होते तेंव्हा त्याला पाडून देणे याला 'गर्भपात' असे म्हणतात. जेंव्हा गर्भामधील स्थित जीवाला हात, पाय, डोळे, इत्यादी अवयव तयार होतात आणि गर्भाचे लिंग (मुलगा अथवा मुलगी) स्पष्ट होते तेंव्हा त्याला पाडून देणे याला 'गर्भहत्या' असे म्हणतात. गर्भपात, गर्भस्राव, अथवा गर्भहत्या—ह्या तीन गोष्टी कोणत्याही प्रकारे केल्यानंतर महापाप लागते. आपोआप गर्भपात झाला तर त्याचे पाप लागणार नाही. जगामध्ये अनेक प्राणी आपोआप मरतात त्याचे पाप कोणालाच लागत नाही कारण त्यांना कोणीही मारलेले नसते आणि तशी (मारण्याची) कोणाची इच्छाही नसते.

**प्रश्न**—गर्भामध्ये जीव (प्राण) तर असत नाही, तो नंतर येतो तर मग गर्भपाताला 'पाप' कसे काय म्हणता येईल?

**उत्तर**—पुरुषाच्या वीर्याच्या एका थेंबामध्ये हजारो शुक्राणू, असतात, त्यांच्यापैकी ज्या शुक्राणूचा डिंबपेशीशी (स्त्रीच्या गर्भाशयामधील) संयोग होतो त्यापासून गर्भ तयार होतो. शुक्राणू शिवाय गर्भ तयार होऊ शकत नाही. प्राण शक्ती शिवाय गर्भाची वृद्धी होऊ शकत नाही. जीवामध्ये प्राणशक्ती प्रथम सूक्ष्म—रूपाने वास करीत असते परंतु गर्भामध्ये तिचा प्रवेश होताच ती प्राणशक्ती 'स्थूल' होते आणि गर्भ वाढीस लागतो. गर्भ वाढल्यानंतर जेंव्हा प्राणशक्ती विशेषत्वाने प्रचितीस येते आणि गर्भ हालचाल करावयास लागतो तेंव्हा लोक म्हणावयास लागतात की, आता गर्भामध्ये जीव आला.

**प्रश्न**—एखाद्या स्त्रिचा नैसर्गिक रीत्याच गर्भपात झाला तर ?

**उत्तर**—हा एक प्रकारचा रोग आहे त्यावर उपचार करावयास पाहिजे. एका स्त्रीचा पाच-सात वेळ गर्भपात झाला. एका सत् पुरुषाने तिच्या कुटुंबीयांना सांगितले की, तिच्या गर्भाशयामध्ये अत्यंत उष्णता निर्माण झाली आहे त्यामुळे गर्भपात होतात; त्यामुळे या रोगावर पुढीलप्रमाणे उपाय करावा—तेंव्हा या स्त्रीला गर्भधारणा होईल तेंव्हा तिला पुढील विधिनुसार गायीचे दूध पाजा. एका भांड्याच्या तोंडावर दूध गाळावयाचा कपडा बांधा, त्या कपड्यावर दळलेली साखर टाकून त्यावर गायीचे दूध काढा त्यामुळे ती साखर दुधात मिसळून भांड्यामध्ये जाईल हे धारोष्ण दूध त्या स्त्रीला ताबडतोब सकाळी उपाशी पोटी असतांनाच पाजावे, हा कार्यक्रम नित्य नेमाने एक महिनाभर करावा. यानुसार एक महिनाभर हा कार्यक्रम त्या स्त्रीने नियमीतपणे पार पाडला. त्यामुळे त्या स्त्रीचा गर्भपात न होता तिला संततीची प्राप्ती झाली. ती मुले आजही जीवंत आहेत.

गर्भपाताच्या रोगावर आयुर्वेदामध्ये अनेक प्रकारच्या औषधी सांगितल्या आहेत. निष्णात वैद्याकडून त्या औषधी घ्याव्यात.

**प्रश्न**—एखाद्या कठीण प्रसंगी गर्भपात करणे अनिवार्य असेल तर काय करावे ?

**उत्तर**—अशा वेळी गर्भपात केल्याचे पाप तर लागणारच. स्त्रीचा जीव वाचविण्याकरीता लोक गर्भपात करतात; परंतु असे करू नये यावर कांही तरी इलाज करावा. जे व्हायचे असेल ते तर होणारच. स्त्रीचा मृत्युच आला असेल तर गर्भपात केल्यानंतर देखील ती मरणारच. जर तिचे आयुष्य शिल्लक असेल तर गर्भपात केला तरी ती मरणार नाही. मृत्यु तर (प्रत्येकाचा) यथासमय

होणारच. यासाठी कारण कांहीही असू शकते. त्यामुळे कोणत्याही परिस्थितीमध्ये गर्भपात करू नये.

**प्रश्न**—कुमारिका असतांना गर्भधारणा झाली तर गर्भपात करावा किंवा नाही?

**उत्तर**—कुमारिकेला ज्या व्यक्तीपासून गर्भधारणा झाली असेल त्या व्यक्तीसोबत तिचा विवाह करून द्यावा. जर विवाह करणे शक्य नसेल तरीही गर्भपात करू नये. मूलाचा जन्म होऊ द्यावा. काही दिवस त्याचे पालन करावे आणि थोडे मोठे झाल्यानंतर त्याला अनाथाश्रमात भरती करावे; किंवा जर कोणी दत्तक (ओटीमध्ये) घेत असेल तर त्याला दत्तक द्यावे.

जर कन्येसोबत कोणी बलात्कार करेल तर त्या बलात्कारी व्यक्तीला महापाप लागेल. जर हा संभोग मुलीच्या इच्छेनुसार झाला असेल तर तिला देखील काही अंशी पाप लागेल; कारण सर्व प्रकारच्या पापाच्या मुळाशी भोगेच्छाच असते. भोगेच्छा मुळीच नसेल तर पाप लागणार नाही.

जर कुमारिकेला गर्भधारणा झाली असेल तर तिच्या माता-पित्यांना देखील त्याचे पाप लागणार; कारण त्यांनी आपल्या मुलीकडे सुरूवातीपासूनच लक्ष द्यावयास पाहिजे होते. तिला फाजील स्वातंत्र्य द्यावयास नको होते.

**प्रश्न**—अशा मुलीची समाजामध्ये बदनामी होऊन तिच्यासोबत कोणी विवाह केला नाही तर अशा परिस्थितीमध्ये काय करावे?

**उत्तर**—जर पापच केले असेल तर बदनामी सहन करावीच लागेल. गर्भपात करणे, आत्महत्या करणे, आणि घरातून पळून जाणे—या तीन प्रकारच्या हत्येपासून (पापापासून) वाचण्याकरीता बदनामी सहन करणे केंव्हाही—श्रेयस्कर होय. अशा मुलीसोबत कोणी विवाह करणार नाही तर पित्याच्याघरीच राहून तिने

परमेश्वराचे भजन-चिंतन करावे; यामुळे तिला तिच्या पापाचे प्रायश्चित्त देखील मिळेल.

**प्रश्न**—एखाद्या विवाहित स्त्रीला बलात्कारातून गर्भधारणा झाली असेल तर अशा वेळी काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—शक्यतोवर अशा परिस्थितीमध्ये स्त्रीने चूप रहावे. तिच्या पतिला याचा पता लागला असेल तर त्याने ही चूप रहावे. दोघानींही आपले बिंग फुटणार नाही याची काळजी घ्यावी. वास्तविकरीत्या नेहमी सावध रहावयास पाहिजे त्यामुळे अशा घटना शक्यतोवर घडून येणार नाहीत. गर्भपात करण्याविषयी आम्ही मुळीच संमती देणार नाही कारण गर्भहत्या करणे हे एक महापाप आहे.

**प्रश्न**—नसबंदीची शस्त्रक्रिया करण्यामध्ये कोणता तोटा आहे?

**उत्तर**—समाजामध्ये असे प्रत्यक्ष पहावयास मिळते की ज्यांनी अशा प्रकारची शस्त्रक्रिया केली आहे त्यांच्यापैकी अनेकांची शरीरे आणि हृदये दुर्बळ झालेली आहेत. त्यांची शरीरे ही अनेक रोगांचे माहेरघर बनली आहेत; बनत आहेत आणि बनतील. पशुंच्या बाबतीत देखील आपणास असे पहावयास मिळते की, ज्या वासराचा 'बैल' बनविला जातो त्याच्या मांसामध्ये सांडाच्या मांसामध्ये असलेली शक्ती नसते. सांडाच्या मांसाला बैलाच्या मांसापेक्षा ईराक, ईराणामध्ये अधिक भाव (किंमत) मिळते असे आम्ही ऐकले आहे. अशा प्रकारे नसबंदीची शस्त्रक्रिया करून पुरूषत्त्व शक्तीला अवरोध उत्पन्न केल्यामुळे अथवा तिला नष्ट केल्यामुळे शरीरिक शक्ती देखील नष्ट होते. उत्साह, निर्भयता आणि मानसिक शक्ती देखील नष्ट होते.

जे लोक नसबंदीची शस्त्रक्रिया करून आपली पुरूषत्त्व शक्ती नष्ट करुन येतात त्यांना 'नपुंसक' असे म्हणता येईल.

त्यांच्या द्वारे पितरांना पिंडदान दिल्या जात नाही* अशा पुरुषांना पाहणे अशुभ मानल्या गेले आहे. महत्वाच्या कामाकरीता गमन करतेवेळी त्यांचे दर्शन झाले तर तो एक अपशकुन आहे असे समजतात.

ज्या स्त्रीयांनी संतती नियमनाची शस्त्रक्रिया केलेली आहे त्यांना श्वेतप्रदर अथवा रक्तप्रदर झालेला आहे. त्यावर कोणत्याही प्रकारचा इलाज नाही. राजस्थाना—मध्ये अशा प्रकारच्या शस्त्रक्रियेमुळे शेकडो स्त्रिया मरण पावल्या आहेत; आणि काही स्त्रियांना असाध्य रोग झालेले आहेत. वर्तमान–पत्रात अशा प्रकारच्या बातम्या नेहमी येत असतात; शस्त्रक्रियेमुळे स्त्रियांचे शरीर दुर्बळ होते. उठताना आणि बसताना तिच्या डोळ्यासमोर अंधारी येवून काजवे चमकतात. छातीमध्ये आणि पाठीमध्ये दुखावयास लागते. काम करण्याचा उत्साह नाहीसा होतो. असे आम्ही डॉक्टराकडून ऐकले आहे.

ज्या स्त्रिया संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करून घेतात त्यांचे स्त्रीत्व (गर्भधारणाशक्ती) नष्ट होते. अशा स्त्रियांचे मुखावलोकन करणे हा एक प्रकारचा अपशकुन आहे. भगवंताने दिलेल्या शक्तीचा नाश करण्याचा अधिकार कोणालाही नाही. तो एक प्रकारचा अपराध आहे. ज्या स्त्रियांनी शस्त्रक्रियेद्वारे आपले स्त्रीत्व नष्ट केलेले आहे त्या तर पापाच्या भागीदार आहेतच परंतु ज्या स्त्रीया दुसऱ्यांना या गोष्टीची प्रेरणा देतात, आग्रह करतात त्या नवीन पाप करीत असतात. ज्याप्रमाणे गीतेचे अध्ययन करण्याचे फार महात्म्य आहे परंतु त्यापेक्षाही अधिक महात्म्य तिचा प्रसार (प्रचार) करण्याचे आहे (गीता १८। ६९)

* अंगहीनाश्रोत्रियषण्ढशूद्रवर्जम्।

(कात्यायनश्रौतसूत्रं १। १। ५)

त्याप्रमाणे ज्या स्त्रीया संतती प्रतिबंधक शस्त्रक्रियेचा प्रचार करतात त्या महापाप करीत असतात. आणि गोहत्याऱ्यांची संख्या वाढविण्यामध्ये सहाय्यक ठरल्यामुळे गोहत्येच्या पापामध्ये भागीदार होतात. भोळ्याभाबड्या स्त्रीया अज्ञानामुळे अशा प्रकारचे पाप करून बसतात त्यांनी या पापापासून स्वत:ला वाचवावयास पाहिजे.

कोणताही मनुष्य कोणत्याही प्रकारचा अपराध करीत असेल तर त्याच्या प्राण—शक्तीचा लवकर नाश होतो आणि त्यामुळे त्याचा मृत्युदेखील जवळ येतो. अपराध, पाप करताना अथवा तसे करण्याचे मनात आल्यानंतर श्वासोच्छ्वासाचा वेग वाढतो. प्राण क्षुब्ध होतो—हे प्रत्यक्ष अनुभवायास मिळते. याचा अनुभव कोणीही घेऊन पहावा.

नसबंदी शस्त्रक्रिया करणे हे व्यभिचाराला मुक्त संधी देण्यासारखे होय. हे फार मोठे पाप आहे. पशुंचा बली देणे, वध करणे याला अभिचार असे म्हणतात. त्यापेक्षाही जो विशेष अभिचार असतो त्याला ‘व्यभिचार’ असे म्हणतात. त्यामुळे मनुष्याच्या मनातील धार्मिक भावना, पारमार्थिक भावना नष्ट होतात आणि त्याची अधोगती होते.

मनुष्य-शरीर केवळ परमात्मप्राप्ती—करीताच मिळालेले आहे. परंतु त्याला परमात्मप्राप्तीकडे न लावता केवळ भोग भोगण्यामध्ये लावणे, आणि इतकेच नाही तर केवळ भोग भोगण्याकरीता मोठमोठी पापकर्मे करणे, गर्भपात करणे, संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करणे हा केवढा अनर्थ आहे. या पापकर्मामुळे आणि भोग भोगण्यामुळे काय सिद्ध होणार आहे? नसबंदी शस्त्रक्रियेमुळे कोणाला धार्मिक—पारमार्थिक लाभ झाला आहे काय? नसबंदी मुळे केवळ लोकांच्या मनातील भोगबुद्धी वाढत आहे. मनुष्या-

च्या ठिकाणी दिसून येत असलेली भोगबुद्धी आजकाल पशुपक्ष्यांच्या ठिकाणी देखील तेवढ्या प्रमाणात दिसून येत नाही. जर तुम्हाला संततीप्राप्तीची इच्छा नसेल तर आपले जीवन संयमित ठेवा, त्यामुळे तुमच्या शरीरामधील शक्तीचा विकास होईल, तुमच्या ठिकाणी धर्मपरायणता, ईश्वरपरायणता प्राप्त होईल; आणि तुमचा मनुष्य जन्म सफल होईल. संतांनी

म्हटले आहे—

**के शत्रवः सन्ति निजेन्द्रियाणि।**
**तान्येव मित्राणि जितानि यानि॥**

(प्रश्नोतरी ४)

'म्हणजेच मनुष्य जेंव्हा इंद्रियांना वश होतो तेंव्हा ती इंद्रिये त्याची शत्रु बनतात. त्यामुळे त्याची इहलोकात आणि परलोकातही अधोगती होते. परंतु जर तो आपल्या इंद्रियांना जिंकून घेईल तर तीच इंद्रिये त्याचे मित्र बनतात त्यामुळे त्याला इहलोकी परम सौख्य प्राप्त होऊन परलोकी परमगती प्राप्त होते. गीतेमध्ये म्हटले आहे—

**उद्धरेदात्मनात्मानं नात्मानमवसादयेत्।**
**आत्मैव ह्यात्मनो बन्धुरात्मैव रिपुरात्मनः॥**

(६।५)

'आपल्याच योगाने आपला उद्धार करा, आपली अधोगती होऊ देऊ नका; कारण आपणच आपले मित्र आहात आणि आपणच आपले शत्रु आहात.'

**प्रश्न**—गर्भपात केल्यामुळे कोणते नुकसान होते?

**उत्तर**—गर्भपातामुळे तर नुकसानच नुकसान होते. कृत्रिम गर्भस्त्राव, गर्भपात केल्यामुळे स्त्रीचे शरीर विकृत बनते; ते दुर्बळ होते. तारूण्यात दौर्बल्यपणाची जाणीव होणार नाही परंतु

प्रौढावस्था प्राप्त होताच शारीरिक दुबळेपणा जाणवावयास लागेल. जोपर्यंत शरीरामध्ये रक्त तयार होण्याची क्रिया जलद गतीने सुरू असते तोपर्यंत शारीरिक दुबळेपणाची जाणीव होणार नाही परंतु रक्त निर्मितीचा हा वेग थोडासा जरी मंदावला तरी शारीरिक दुबळेपणाची जाणीव व्हावयास लागेल. गर्भपातामुळे बहुतेक स्त्रियांना प्रदर हा रोग होतो. याशिवाय गर्भपातामुळे रक्त पडण्याचा रोग देखील जडतो.

मुलाचा जन्म झाल्यामुळे स्त्रीच्या शरीरात विकृती तयार होत नाही कारण प्रसूतिक्रिया ही एक नैसर्गिक क्रिया आहे; आणि ती योग्य वेळेवरच घडून येत असते. तात्पर्य असे आहे की नैसर्गिक क्रियामुळे विकृती तयार होत नाहीत तर त्या केवळ कृत्रिम क्रियामुळेच तयार होत असतात.

**प्रश्न**—एक-दोन मुले झाल्यानंतर स्त्री 'आई' बनते; त्यानंतर संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करण्यास काय हरकत आहे?

**उत्तर**—ती 'आई' तर पूर्वीच होती. आता संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया केल्यामुळे तिची 'स्त्री' ही संज्ञाच राहिली नाही. कारण शुक्र-डिंबाच्या संयोगाने जिच्या उदरामध्ये गर्भधारणा होते तिलाच स्त्री * असे म्हणतात. जी गर्भधारण करू शकत नाही तिला 'स्त्री' असे म्हणता येणार नाही; आणि जो गर्भस्थापन करू शकत नाही त्याला पुरुष म्हणता येणार नाही. शस्त्रक्रिया करून सन्तानोत्त्पती करण्याची शक्ती नष्ट करून घेणाऱ्या पुरुषाला 'नपुंसक' म्हणता येईल; परंतु स्त्रीला काय म्हणावे—हे आम्हाला समजत नाही.

'परिवार-नियोजन' हा नारी-जातीचा घोर अपमान आहे.

* 'स्त्यैष्ट्यै शब्दसंघातयो:'। स्त्यायत:—संगते भवत: अस्यां शुक्रशोणिते इति स्त्री।
(सिद्धान्तकौमुदी, बालमनोरमा)

कारण त्यामुळे नारी केवळ भोग्य-वस्तु बनते. कोणी मनुष्य संतान प्राप्तीचा उद्देश ठेवून वेश्यागमन करतो काय? जर कोणी स्त्रीपासून संततीची इच्छा न करता केवळ भोग भोगण्याकरीताच तिचा उपयोग करीत असेल तर त्याने तिला एक प्रकारे 'वेश्याच' बनविले असेच म्हणावे लागेल. हा काय नारी-जातीचा सन्मान आहे काय? नारी-जातीचा सन्मान आई बनण्यामध्ये आहे भोग्यवस्तु बनण्यामध्ये मुळीच नाही. जर स्त्री शस्त्रक्रिया करून आपल्या मातृत्व—शक्तीला नष्ट करीत असेल तर पादत्राणा—प्रमाणे ती केवळ भोग्यवस्तु बनते. हा नारी-जातीचा किती भयंकर अपमान आहे; अनादर आहे.

**प्रश्न**—ज्या स्त्रीला मुले होतच नाहीत (वांझ असते) तिला दोष लागतो की नाही?

**उत्तर**—जो स्त्री नैसर्गिक रीत्याच वांझ असते (त्यामुळे तिला संतती होत नाही) हा तिचा दोष नाही. जी स्त्री कृत्रिम उपायांनी मातृत्वशक्ती नष्ट करते तिला, दोष लागतो.

**प्रश्न**—ज्या स्त्रीया गर्भनिरोधक गोळ्या खाऊन गर्भधारणाच होऊ देत नाहीत त्यांना देखील पाप लागते काय?

**उत्तर**—जीव (जीवात्मा) मनुष्य शरीरामध्ये येऊनच परमात्म्याला प्राप्त करून घेऊ शकतो; आपला तसेच इतरांचाही उद्धार करून घेऊ शकतो. परंतु आपल्या भोगेच्छांना वश होऊन जीवात्म्याला मनुष्यदेहामध्ये येण्याची संधीच मिळू न देणे हे देखील पापच आहे.

गीतेमध्ये देखील भगवंताने कामनेलाच-भोगेच्छा आणि सुखेच्छेलाच संपूर्ण पापाचे मूळ म्हटले आहे—(३ । ३७). भोगेच्छा हीच संपूर्ण पापाची जननी आहे. परिवार-नियोजनाचा अर्थ केवळ भोगेच्छा हाच आहे; त्यामुळे संतती प्रतिबंधक गोळ्या खाऊन संतती-निरोध करणे हे पापच आहे.

**प्रश्न**—जर एखादी स्त्री पतिची संमती न घेताच गर्भपात करून घेत असेल तर तिच्या बाबतीत काय करावे?

**उत्तर**—अशा स्त्रीच्या बाबतीत 'तीचा कायमचा त्याग' करण्याची शास्त्रामध्ये आज्ञा दिलेली आहे—'**तस्यास्त्यागो विधीयते**' (पाराशरस्मृति ४। २०)

गर्भपात करणे हे महापाप आहे आणि ही गोष्ट आपल्या पतिपासून लपवून ठेवणे हा भयंकर अपराध आहे. अशा पापाची सजा देखील भयंकर असते. जर संतती प्राप्तीची इच्छा नसेल तर संयमाने वागावे. संयम ठेवणे हे पाप नाही, तो अन्याय नाही; उलट त्यामध्ये मोठे पुण्य आहे; त्याग व तपश्चर्या आहे.

**प्रश्न**—वर्तमान कालीन शासन प्रणाली गर्भपात, नसबंदी इत्यादींना पाप न मानता चांगले कार्य मानते, तर मग असे करणारांना पाप लागत नाही काय?

**उत्तर**—कोणी मानोत अथवा न मानोत; परंतु पाप तर लागणारच. जितकी पापे होत असतात ती कोणाच्या मानण्यावर अथवा न मानण्यावर अवलंबून नसतात. पापाच्या संदर्भात—म्हणजेच अमुक पापकर्म आहे—वेद, शास्त्र आणि संत वचनेच प्रमाण आहेत.

पापकर्मे केल्यामुळे पाप लागतेच आणि त्याचे फळ देखील भोगावे लागते. आम्ही असे पाहिले आहे की जो पशु बळी दिला जातो त्याला त्याच्या मागच्या पायाच्या साह्याने ज्या झाडाला टांगतात ते झाड देखील पापाच्या योगाने वाळून जाते. जे कसाई पैसे घेऊन प्राण्यांना कापण्याचे काम करतात त्यांचे हात कांही दिवसांनी काम करीत नाहीत त्यामुळे त्यांना हाताला सुरी बांधून प्राणी कापावे लागतात. लांडग्याला सात-सात पिल्ले होतात आणि हरणीला दोनच पिल्ले होतात तरी देखील हरणांचाच

कळप पहावयास मिळतो लांडग्यांचा कळप पहावयास मिळत नाही. तात्पर्य असे आहे की हिंसादी पापकर्मे करणाऱ्यांची परंपरा फार काळ टिकू शकत नाही.

एका सत्पुरुषाला कोणीतरी प्रश्न विचारला की, ज्या शास्त्रामध्ये, सांप्रदायामध्ये बळी देण्याची, कुर्बानी करण्याची आज्ञा दिलेली आहे, त्या आज्ञेचे पालन करणाऱ्या व्यक्तिंना पाप लागत नसेल; कारण ते आपल्या शास्त्राच्या, सांप्रदायाच्या आज्ञेचे पालन करतात. यावर त्या सत्पुरूषाने उत्तर दिले की— जे लोक बळी देतात कुर्बानी करतात ते देखील जर सहा महिने अंतःकरणापासून भगवंताच्या नामाचा जप करतील तर नंतर ते बळी देऊ शकणार नाहीत; कुर्बानी करू शकणार नाहीत. 'शुद्ध' अंतःकरण असणारा व्यक्ती शास्त्राची आज्ञा असेल तरीही पाप करू शकत नाही. त्यामुळे ज्या शास्त्रामध्ये बळी देण्याची आज्ञा दिलेली आहे ती आज्ञा मानू नये.

एक धर्मशास्त्र असते आणि एक अर्थशास्त्र असते. धर्मशास्त्र मनुष्याला आपल्या कर्तव्याचे ज्ञान देते आणि कर्तव्य करण्याची जाणीव करून देते; त्यामुळे मनुष्याचे इहलोकी-आणि परलोकातही कल्याण होते. अर्थशास्त्र हे मनुष्याच्या दृष्ट फळाचे वर्णन करते. जी मनुष्ये कामनेला वश होऊन दृष्ट फला-(धन-संपत्ती, पुत्र, स्वर्गादिची प्राप्ती—) करीता अर्थ-शास्त्राची आज्ञा मानून पापकर्मे करतात ते पापाचे वाटेकरी होत असतात; कारण अर्थ—शास्त्रामध्ये कामनेची—सकाम भावनेची—प्रधानता असते आणि कामना हीच सर्व पापांचे मूळ आहे. (गीता ३। ३७) जो शंभर यज्ञ करून इंद्र बनतो त्याच्याद्वारे देखील शास्त्रानुसार हिंसा घडून येतच असते. त्या हिंसेच्या पापाचे फळ तर भोगावेच लागते.त्यामुळेच इंद्रावर संकट (प्रतिकूल परिस्थिती)

येते त्यावेळी त्याची हार होते, आणि तो भयाने सैरावैरा पळत सुटतो; लपतो; आणि त्याच्या अंतःकरणात दाह उत्पन्न होतो. त्यामुळे हिंसेच फळ मिळतेच; कोणी हिंसेला मानो अथवा न मानो. तात्पर्य असे आहे की, ज्या ठिकाणी धर्मशास्त्र आणि अर्थशास्त्र दे दोन्ही असतील त्या ठिकाणी धर्मशास्त्रा-मधीलच वचने मान्य करावयास पाहिजेत, कारण अर्थशास्त्रापेक्षा धर्मशास्त्र श्रेष्ठ आहे, बलवान आहे.*

आजकाल सरकार गर्भपात करण्याला पाप मानत नाही, परंतु न मानल्यामुळे पाप लागणार नाही-असे नाही. पाप तर लागणारच, त्याला कोणी मानो अथवा न मानो. ज्याप्रमाणे पूर्वीच्या काळी राजे लोक निषिद्ध कर्मे करण्या विषयी प्रजेला आज्ञा करीत असत, प्रेरणा देत असत तेंव्हा त्याचे पाप राजा व प्रजा या दोघानांही लागत असे.

(उदाहरणार्थ—राजा वेनाने स्वतः निषिद्ध कर्मे केली आणि प्रजेकडूनही करविली) त्याप्रमाणे आजचे सरकार गर्भपातादी निषिद्ध कर्मे करण्याविषयीची जनतेला प्रेरणा देत आहे तर त्याचे पाप सरकारला आणि जनतेला (निषिद्ध कर्मे करणाऱ्यांना) देखील लागल्याशिवाय राहणार नाही.

**प्रश्न**—रामचरितमानसामध्ये वर्णन आढळते की—‘**समरथ कहुँ नहिं दोषु गोसाईं। रबि पावक सुरसरि की नाईं॥**’ (बालकांड ६७।४) त्यामुळे ज्यांना राज्यपद मिळाले आहे ते (राजा, सरकार) समर्थ आहेत तर मग त्यांना पाप कसे काय लागणार?

**उत्तर**—ते समर्थ नाहीत. ज्यांच्याजवळ दुसऱ्यांचे दोष दूर

---

* स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः।
अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः॥

करण्याची शक्ती असते त्यांना 'समर्थ' असे म्हणतात, उदाहरणार्थ—सूर्य अंधकाराचा नाश करतो, अपवित्र वस्तुला पवित्र व अशुद्ध वस्तुला शुद्ध बनवितो. सर्वांच्या ठिकाणी असलेल्या पाण्याला आकर्षित करतो, समुद्राच्या खारट पाण्याचे गोड पाण्यात रूपांतर करून त्याची पृथ्वीवर वृष्टी करतो. परंतु एवढे करून देखील सूर्य कधीही अपवित्र अथवा अशुद्ध होत नाही. अग्नी सर्व प्रकारच्या अशुद्धीला जाळून टाकतो; त्याचे भक्षण करून त्यांना शुद्ध करतो परंतु स्वतः अशुद्ध होत नाही, त्याला दोष लागत नाही. गंगा नदी प्रदूषित पाण्याला शुद्ध करते, पापांचा नाश करते परंतु तिला दोष लागत नाही. तात्पर्य असे आहे की, अशुद्धाला शुद्ध करणे, त्यामधील दोष नष्ट करणे; आणि स्वतः जसेच्या तसेच राहणे—हा 'समर्थपणा' आहे. ज्यांना केवळ राज्यपद अथवा वैभव प्राप्त झाले आहे त्यांना 'समर्थ' म्हणता येणार नाही.

सांसारिक पद, अधिकार,वैभवादिची प्राप्ती झालेली आहे असा मनुष्य 'समर्थ' असू शकत नाही; कारण त्याचे सामर्थ्य हे पद, अधिकार इत्यादीच्या अधीन असते. तो मनुष्य तर पद, अधिकार इत्यादीचा गुलाम आहे, दास आहे, पराधीन आहे. त्यामुळे तो स्वतः समर्थ आहे असे कसे म्हणता येईल? तात्पर्य असे आहे की जो मनुष्य आपणाला 'प्राप्त झालेल्या' गोष्टीमुळे स्वतःला समर्थ मानतो तो वास्तविक दृष्ट्या असमर्थच आहे. कारण त्याच्या ठिकाणी जे 'सामर्थ्य' दिसून येते ते त्याचे स्वतःचे नसून त्याला प्राप्त झालेल्या इतर गोष्टीचेच आहे. जे खरे सामर्थ्यवान असतात त्यांचे सामर्थ्य स्वतःवर अवलंबून असते. ज्याप्रमाणे सूर्य, अग्नी आणि गंगानदीचे सामर्थ्य कोणाच्याही अधीन नाही परंतु त्यांचे स्वतःचे आहे. म्हणून राज्य, अधिकारपदाच्या

गर्वामुळे जे लोक पापकर्मे करतात, करवितात ते आपल्या सामर्थ्याचा महान दुरूपयोग करीत असतात. त्याची सजा (पापाचे फळ) त्यांना भोगावेच लागेल. त्यांच्या ठिकाणी असलेले सामर्थ्य पापाचा नाश करणारे न ठरता पाप वर्धित करणारे ठरते. त्यामुळे खऱ्या अर्थाने जे समर्थ नाही त्या सरकारला, शासन प्रणालीला समर्थ मानून मनुष्याने कधीही पापकर्मे करू नयेत.

**प्रश्न**—सरकारच्या आदेशामुळे जर डॉक्टर मंडळी गर्भपात, नसबंदी शस्त्रक्रिया इत्यादी करीत असतील तर त्यांना महापाप लागेल काय?

**उत्तर**—त्यांना तर अवश्य महापाप लागेल. कारण लोभ हेच पापाचे मूळ आहे. थोड्याशा लोभापोटी ते कितीतरी जीवांची हत्या करीत असतात-अशी घृणास्पद कृत्ये करून, महापाप करून मिळविलेल्या पैशाचे अन्न खाल्ल्यामुळे त्यांची भविष्यकाळात अत्यंत दुर्दशा होईल.

शास्त्रांत आले आहे की, जर गर्भपात केलेल्या स्त्रीची भोजन पदार्थांवर दृष्टी पडलीं तर ते अन्न अभक्ष्य होते म्हणजेच खाण्यायोग्य राहत नाही.

**भ्रूणघ्नावेक्षितं चैव संस्पृष्टं चाप्युदक्यया।**
**पतत्रिणाऽवलीढं च शुना संस्पृष्टमेव च॥**

(मनुस्मृति ४।२०८)

**अर्थ**—गर्भहत्या करणाऱ्याने पाहिलेले, विटाळशा स्त्रीने स्पर्श केलेले, पक्षाने खाल्लेले आणि कुत्र्याने स्पर्श केलेले अन्न खाऊ नये.

नोकरीमध्ये आपला 'समय' नष्ट (खर्च) करून काम करून पैसे घेतल्या जातात. आपला धर्म, कर्तव्य, सत्कर्म देऊन पैसे घेतल्या जात नाहीत. पाप, अन्याय, हत्या, हिंसा इत्यादी करून

पैसे मिळविणे हे तर शुद्धपाप आहे. त्यामुळे एखादा मालक नोकराला पाप, अन्याय इत्यादी करावयास सांगत असेल तर त्याने मालकास नम्रतापूर्वक सांगावें की, मी आपल्या कामाकरीता एक दोन तास अधिक वेळ देऊ शकतो, परंतु धर्माचा नाश करून मी पाप हिंसादी कर्मे करणार नाही. मला आपण नोकरीवर ठेवा अथवा ठेवू नका, आपली मर्जी!

एका सद्गृहस्थाने गर्भपात, नसबंदीची काम केली नाहीत. त्यामुळे त्याला नोकरीवरून काढून टाकल्या गेले. त्याने न्यायालयात आपणावर झालेल्या अन्यायाची दाद मागीतली, नोकरीवर घेणे भाग पडले. जर सरकारी कायदाच असेल तर तो मुसलमान, ख्रिश्चन इत्यादी सर्व प्रकारच्या धर्माकरीता समान असावयास पाहिजे, केवळ हिंदुकरीताच असू नये. कोणत्याही एका जातीवर, वर्णसांप्रदायावर जबरदस्ती करणे, त्यांना पापकर्मे करावयास भाग पाडणे, किंवा पाप करण्याविषयीचा कायदा बनविणे हे (सरकारला) योग्य नाही.

**प्रश्न**—जर कोणी नजर चुकीने, अज्ञानपणामुळे नसबंदी शस्त्रक्रिया करून घेतली असेल तर त्याने काय करावे?

**उत्तर**—डॉक्टर मंडळीचे म्हणणे असे आहे की, जर केवळ 'नसच' कापली असेल तर ती पुन्हा जोडल्या जाऊ शकते; परंतु जर स्त्रीचा गर्भाशयच काढून टाकल्या गेला असेल तर त्यावर कोणत्याही प्रकारचा उपाय नाही. त्यामुळे केवळ नसबंदीची शस्त्रक्रिया केल्या गेली असेल तर ती पुन्हा ठीक करवून घ्यावी. अशी नस जोडणीची कार्ये झालेली आहेत आणि अशा पुरुषांना पुन्हा संतती देखील झालेली आहे.

अशा प्रकारचे पुन्हा नस जोडणी करून आपले पुरुषत्व अथवा स्त्रीत्व ठीक करून घ्या. पूर्वी केलेल्या अपराधाविषयी

पश्चाताप करा. त्यामुळे तुमच्या हातून दिल्या गेलेले पिंडदान पितरांना मिळेल. ब्रम्हचर्याचे पालन केले गेले तर तेज, शक्ती व उत्साह यांची देखील वृद्धी होईल.

**प्रश्न**—एखाद्या स्त्रीने अज्ञानीपणामुळे अथवा नजर चुकीने गर्भपात करून घेतला असेल तर तिने कोणते प्रायश्चित घ्यावे?

**उत्तर**—त्या स्त्रीने एक वर्षभर दररोज एक लाख रामनामाचा जप करावा. परंतु जर एखादी स्त्री जाणून बुजून गर्भपात करीत असेल तर तिने केलेल्या नामजपामुळे—देखील तिच्या पापाचे प्रायश्चित्त होणार नाही. तिला तर तिच्या पापाचे प्रायश्चित्त भोगावेच लागेल. कारण जे नाम महापापाचा नाश करणारे आहे त्याच्या आधाराने जर कोणी पाप करीत असेल तर ते नाम त्याचे रक्षण करणार नाही. त्यामुळे त्याची पापे नष्ट न होता अधिक दृढ होतात. पूर्वी तो नामाशिवाय पाप करण्याला घाबरत होता, आता तो नामाच्या आश्रयामुळे पापे करावयास कचरत नाही हा त्या नामाचा महान दुरूपयोग आहे. अपराध आहे. त्याबद्दलची सजा तर त्याला भोगावीच लागेल.

**प्रश्न**—कुटुंब-नियोजन केले नाही तर लोकसंख्येची अवास्तव वाढ होईल, त्यामुळे लोकांना खावयास अन्न मिळणार नाही; तर मग अशा परिस्थितीमध्ये लोक कसे जगतील?

**उत्तर**—हा प्रश्न युक्तीसंगत वाटत नाही; कारण जर मनुष्यशरीर उत्पन्न झाले असेल तर त्याकरीता अन्न देखील निर्माण होत असते. भगवंताच्या राज्यात असा अंधार नाही की मनुष्ये निर्माण होतील आणि त्यांच्याकरीता अन्न निर्माण होणार नाही.

**प्रारब्ध पहले रचा, पीछे रचा शरीर।**
**तुलसी चिंता क्यों करे, भज ले श्रीरघुबीर॥**

आईच्या स्तनामध्ये प्रथम दूध उत्पन्न होते आणि नंतर मुलाचा

जन्म होतो-मूल अथवा दूध यापैकी अगोदर कोण निर्माण होते याचा पत्ता लागत नाही. जेंव्हा मुलाचा जन्म होतो तेंव्हा आई आपल्या स्तनामधील पूर्वीचे जुने दूध काढून टाकून मुलाला नवीन दूध पाजते. आपण एखाद्या समारंभाला जातो तर आपली व्यवस्था त्या ठिकाणी पूर्वीच केलेली असते नंतर आपण त्या ठिकाणी जाऊन पोहचता. असे कोठेही पहावयास मिळत नाही की 'वक्त्याचे भाषण प्रथम होऊन गेले आणि नंतर व्यासपीठ उभारल्या गेले.' वरात उतरण्याची व्यवस्था वरात पोहचण्यापूर्वीच केलली असते; वरात पोहचल्यानंतर केल्या जाते काय? एखादा उत्सव साजरा करावयाचा असेल तर त्याची व्यवस्था पूर्वीच झालेली असते. आपल्या पाहण्यामध्येही आहे आणि वैज्ञानिकांचेही म्हणणे असे आहे की ज्या ठिकाणी वृक्षांची संख्या जास्त असते त्या ठिकाणी पाऊस देखील जास्त प्रमाणात पडतो. ज्या ठिकाणी वृक्ष नसतात त्या ठिकाणी पाऊस देखील कमीच पडतो. तर मग अशा रीतीने जर मनुष्यांची संख्या वाढली तर अन्न देखील जास्त प्रमाणात उत्पन्न होईल. अन्नाची कमतरता कशी येईल? मनुष्याचा दर्जा काय वृक्षापेक्षाही कमी आहे?

**प्रश्न**—आज अन्नधान्य व इतर जीवनावश्यक वस्तु इतक्या महाग का झाल्या आहेत?

**उत्तर**—थोडासा विचार करून पाहिले तर जेंव्हापासून कुटुंब-नियोजन शस्त्रक्रिया सुरू झाल्या आहेत तेंव्हापासूनच अन्न महाग झाले आहे; आणि उत्पन्नामध्ये घट येत आहे. लोकसंख्याच जर कमी होत आहे तर जास्तीचे अन्न धान्य उत्पन्नच कशाला होईल.? तात्पर्य असे आहे की कुटुंब-नियोजनाची प्रथा रूढ झाल्यामुळेच ही अशी दुर्दशा झाली आहे.

आजकल 'मांस खा, मासे खा, अंडे खा'—अशा प्रकारचा

प्रचार केल्या जात आहे. तर मग पाऊस आणि शेतीची गरजच काय उरली ? कारण मनुष्याने मांस खाल्ल्यामुळे पशुंची संख्या कमी होईल, त्यांच्याकरीता गवताची आवश्यकता राहणार नाही, आणि मनुष्यांने मांस खावयास सुरूवात केली तर त्याला अन्नाची गरज पडणार नाही. तर उगीचीच गवत आणि अन्न कशाला उत्पन्न होईल ?

लोकसंख्या अधिक झाली व पदार्थांचा, वस्तुंचा तुटवडा पडला तरच महागाई वाढत असते. पदार्थ वस्तुचा तुटवडा पडण्याकरीता मनुष्याचा 'आळस—प्रमाद कारणीभूत आहे. आज समाजात आळसी लोकांचे प्रमाण अधिक आहे; उत्पन्नापेक्षा खर्च (फाजील खर्च) जास्तः झालेला आहे; त्यामुळेच महागाई वाढत आहे. अकार्य क्षमता वाढल्यामुळे वस्तु पदार्थ इत्यादी कमी प्रमाणात तयार होत आहेत. त्यामुळे महागाईच्या वाढीला जनसंख्येची वाढ पूर्णतया जबाबदार नाही; तर मनुष्यामधील अकर्मण्यता, आळस, प्रमाद, इत्यादी दोषांची वृद्धी होणे हेच आहे. चोहीकडे निर्माण झालेली अराजकता हे देखील महागाई वाढण्याचे एक कारण आहे.

**प्रश्न**—आजकाल आम्हाला रोजगार उपलब्ध नाही; कामधंदा मिळत नाही; अशा परिस्थितीमध्ये आम्ही काय करावे ?

**उत्तर**—रोजगार अथवा कामधंदा न मिळण्याचे कारण असे आहे की-मनुष्य ज्या देशामध्ये अथवा जनसमुदायामध्ये जातो त्या ठिकाणी तो आपल्या कर्तव्याचे यथायोग्य रितीने पालन करीत नाही. उलट आळसामध्ये आणि निरर्थक प्रयत्नामध्ये विनाकारण कालापव्यय करतो. वास्तविक दृष्ट्या या जगामध्ये 'कामाची' कमी नाही, परंतु काम करणारांची कमी आहे. कामे पुष्कळ आहेत परंतु इमानदारीने आणि तत्परतेने काम करणारांची 'कमी' (कमतरता) आहे. मनुष्य इमानदार आहे आणि त्याला

काम मिळत नाही—असे कधीही होऊ शकत नाही; आळस, प्रमाद, काम करण्याची वृती (नियत) नसणे—इत्यादी दोषामुळेच मनुष्याला काम मिळत नाही.

**प्रश्न**—महागाईच्या या जगामध्ये अधिक मुले असतील तर त्यांचे पालन-पोषण कसे करावे?

**उत्तर**—'गरज हीच शोधांची जननी आहे' हे आपणाला विचारांती पटेल. त्यामुळे लोकसंख्या वाढली तर त्यांच्या पालन-पोषणाची व्यवस्था देखील नक्कीच लागेल. पूर्वीच्या काळी असे पहावयास मिळत असे की ज्या वर्षी कीडेकीटक, फुलपाखरे अधिक प्रमाणात दिसून येत असत त्या वर्षी शेतीचे उत्पन्न भरपूर प्रमाणात येत असे. दुष्काळ पडत नव्हता. त्यांना पाहून लोक आनंदाने म्हणत असत की, यावर्षी खूप पाऊस पडणार; कारण इतके जीवजंतू उत्पन्न झाले आहेत तर त्यांच्या उदर निर्वाहाची व्यवस्था भगवंत करणारच; म्हणजेच यावर्षी खूप अन्न धान्य पिकणार. अशा रितीने भगवंताने पूर्वी जशी व्यवस्था केली होती तशीच आजही करणार. परिवार-नियोजन करून जनतेच्या उदर निर्वाहाची व्यवस्था आपण स्वत:वर घेतली आहे; त्यामुळे आपणाला त्यांची व्यवस्था करणे अवघड होऊन बसले आहे. आपण फक्त कर्तव्यतत्पर रहावे आपल्या परिवाराच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था भगवंत जरूर करतील.

पूर्वीच्या काळी राजे-महाराजांच्या कुळामध्ये हजारोंच्या संख्येने संतानोत्पत्ती होत असे. त्यांचे पालन-पोषण देखील होत असे.याबद्दल अनेक उदाहरणे देता येतील. जसे की, सगर राजाला साठ हजार पुत्र होते. राजा अग्रसेनाला अनेक पुत्र होते त्यांच्या वंशजांना आज 'अग्रवाल' या नांवाने संबोधल्या जाते. धृतराष्ट्राला शंभर पुत्र होते. अशा प्रकारे एका एका पुरुषाला

शेकडोच्या-हजारोंच्या संख्येने संतती होती. गावेच्या गावे एका एका मनुष्यांच्या वंशजापासून वसलेली आहेत.

समाजामध्ये आपणाला प्रत्यक्षपणे असे पहावयास मिळते की जे विरक्त संत असतात, ते आपल्या उदरनिर्वाहाची मुळीच पर्वा करीत नाहीत. त्यांच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था जनता करीत असते. जे लोक आपल्या उदरनिर्वाहाकरीता धडपड करतात त्यांच्या तुलनेने विरक्त संताच्या उदरनिर्वाहाची व्यवस्था चांगल्या रितीने होत असते.

मुसलमान लोक चार चार वेळा विवाह करतात. आम्ही असे ऐकले आहे की एका मुसलमान बांधवाल १५० मुले-मुली झाल्या आहेत. दुसऱ्या एका मुसलमान बांधवाला एकोणवीस मुले झाली होती त्यापैकी दोन मुले मृत्यु पावली आहेत व आजही सतरा मुले हयात आहेत. मुसलमान लोक बहुधा संतती नियमन करीत नाहीत तरीही त्यांच्या मुलाबाळाचे पालन-पोषण होतच असते. काय फक्त हिंदूच अन्न खातात? कपडे परिधान करतात? शिक्षण घेतात? दुसरे लोक अन्न खात नाहीत? कपडे परिधान करीत नाहीत? शिक्षण घेत नाहीत? मुसल्मान बांधव म्हणतात की, मुले होणे हे परमेश्वरी सूत्र आहे त्याला बदलवण्याचा अधिकार मनुष्याला नाही. जे त्याला बदलण्याचा प्रयत्न करतात ते 'विनाकारण' प्रयत्न करीत असतात. वास्तविक दृष्ट्या परिवार नियोजन करणाऱ्यांची संख्या (लोकसंख्या) कमी होत जाते. त्यामुळे मुसलमानांनी असा विचार केलेला आहे की, आपण संतती-नियमन केले नाही तर आपली लोकसंख्या वाढेल व बहुमतावर 'सरकार' निवडल्या जात असल्यामुळे पर्यायाने राज्य देखील आपलेच. त्यामुळे ते केवळ आपली लोकसंख्या वाढविण्याच्याच विचारामध्ये आहेत. परंतु हिंदू लोक थोड्याशा सुखसुविधेकरीता नसबंदी, गर्भपातादी महापापे करण्यात आनंद मानत आहेत. आपली जनसंख्या कमी होत

आहे—याकडेही त्यांचे लक्ष नाही आणि परलोकी या महापापाचे भयंकर प्रायश्चित्त भोगावे लागेल याकडेही त्यांचे लक्ष नाही. केवळ खाण्या—पिण्याकडे आणि सुखोपभोगाकडे तर पशुपक्ष्याचीही वृत्ती असते. जर केवळ मनुष्याचाही अशीच वृत्ती असेल तर मनुष्य व पशु यामध्ये फरक तो कोणता राहिला ?

हिंदू धर्मामध्ये मनुष्य जन्माला 'दुर्लभ' असे म्हटले आहे. आणि मनुष्य जन्मामुळे आपल्या कल्याणाचा मार्ग सुलभ होतो असे म्हटले आहे. त्यामुळे जर एखादा जीवात्मा मनुष्य जन्मामध्ये, हिंदु-धर्मामध्ये जन्म घेण्याचा प्रयत्न करीत असेल तर त्याला रोखून धरणे योग्य नाही, जर आपण तसे कराल तर तो जीवात्मा इतर धर्मामध्ये देह धारण करेल (जन्म होईल) आणि तुमच्या धर्माचा-हिंदूचा—नाश करेल. कारण केवळ एका व्यक्तीसोबत जीवात्म्याचा ऋणानुबंध नसून अनेक जीवासोबत असतो.

कौरव आणि पांडव यांची नऊ-नऊ अक्षौहिणी सेना होती. परंतु एक अक्षौहिणी नारायणी सेना व एक अक्षौहिणी शल्याची सेना कौरवांना मिळाल्यामुळे त्यांची सेना पांडवांच्या सेनेपेक्षा चार अक्षौहिणी व कौरवांची सेना अकरा अक्षौहिणी झाली. अशा प्रकारे हिंदू लोक नसबंदी, गर्भपातादी उपायाद्वारे जर संतती निरोध करतील तर जी मुले त्यांच्या कुळात जन्म घेणारी असतील ती इतर धर्मियांच्या कुळामध्ये जन्म घेतील. जसे की-नसबंदी शस्त्रक्रिया; गर्भपातादी उपायांद्वारे हिंदूनी आत्तापर्यंत बारा कोटी मुलांचा जन्म रोखलेला आहे* त्यामुळे

---

* ज्या व्यक्तींनी संतती नियमन केले आहे त्यांच्या भविष्य काळात होणाऱ्या अनेक संततीचा देखील आपोआपच निरोध झाला आहे. जर प्रत्येक व्यक्तींच्या पुढे होणाऱ्या दोन अथवा तीन संतानांचा (मुलांचा) निरोध मानला तरी ही संख्या चोवीस अथवा छत्तीस कोटीपर्यंत पोहचू शकते.

ती बारा कोटी मुले इतर धर्मियांच्या कुळामध्ये जन्म घेतील तर इतर धर्मियांची लोकसंख्या हिंदूच्या संख्येपेक्षा चोबीस कोटीने वाढेल व ते हिंदूचा नाश करतील. त्यामुळे हिंदूनी देखील आपली संतान परंपरा नष्ट करू नये.

**प्रश्न**—मुलांची संख्या कमी असेल तर त्यांचे पालन-पोषण चांगल्या प्रकारे होईल. आणि कुटुंबामध्ये सौख्य नांदेल; त्यामुळे कुटुंब नियोजन करण्यामध्ये कोणते नुकसान आहे.

**उत्तर**—मुलाबाळांची संख्या कमी असल्यामुळे कुटुंब सुखी राहील—असे म्हणता येणार नाही. ज्यांना मुले कमी आहेत ते दुःखी आहेत आणि ज्यांना मुले मुळीच नाहीत ते देखील दुःखी आहेत; तसेच ज्यांना अधिक प्रमाणात मुले आहेत ते देखील दुःखी आहेत. आम्ही निःसंतान लोकांना भेटलो आहोत, कमी व अधिक मुलबाळे असणाऱ्यांना देखील भेटलो आहोत. वास्तविक दृष्ट्या मुले कमी-अधिक असणे हे सुखदुःखाचे कारण नाही. मुले कमी असलेला मनुष्य सुखी आहे असा एकही मनुष्य आपणाला दिसत नाही. दुःखाचे कारण आहे—भोगपरायणता—'**ये हि संस्पर्शजा भोगा दुःखयोनय एव ते**' (गीता ५।२२) भोगपरायण मनुष्य कधीही सुखी राहू शकत नाही; आणि तो सुखी राहणे शक्यही नाही. जो केवळ 'भोगपरायण असेल त्याला मुलेबाळे अधिक असोत, कमी असोत अथवा मुळीच नसोत, तो नेहमी दुःखीच राहणार.

विवाहानंतर सुरूवातीला स्त्री पुरुषांचे एकमेका-प्रति विशेष आकर्षण असते त्यामुळे जन्माला येणारे पहिले मूल केवळ भोगेच्छेपोटीच जन्माला येत असते अशा रितीने जन्माला येणारे मूल भोगीच (बहुधा) बनत असते. आज समाजामध्ये जे काही सुसंस्कार प्रसारित झाले आहेत; समाजाची सुधारणा झाली

आहे; ती सर्व चांगल्या (सदवर्तनी) व्यक्ती कडूनच झालेली आहे. भोगी, चोर, डाकू, विषयलंपट व्यक्तीकडून समाज सुधारणा घडून येणे शक्य आहे काय? त्यांच्या कडून कधीतरी सुसंस्काराची बीजे पेरली जातील काय? त्यामुळे 'कमी' प्रमाणात जन्माला आलेली मुले भोगपरायणच असतील; त्यांच्याकडून समाजाचे पतनच होण्याची शक्यता जास्त आहे.

**प्रश्न**—भगवान श्रीराम, भरत इत्यादीनीं देखील परिवार नियोजन केले होते—***'दुइ सुत सुंदर सीताँ जाए'*** आणि ***'दुइ दुइ सुत सब भ्रातन्ह केरे'*** (मानस उत्तर० २५।३-४) त्यामुळे आज देखील दोनच मुले असतील तर काय नुकसान आहे?

**उत्तर**—श्रीरामाने नसबंदी शस्त्रक्रिया केली होती अथवा सीतेनें कुटुंब नियोजन शस्त्रक्रिया करून घेतली होती अशा प्रकारचे वर्णन कोणत्याही प्रकारच्या रामायणामध्ये आढळून येत नाही. अशा प्रकारच्या संतती निरोधक शस्त्रक्रिया तर एवढ्यातच (आपल्या डोळ्यादेखतच) सुरू झालेल्या आहेत. ह्या शस्त्रक्रिया विदेशामध्ये सुरू झाल्या आहेत. भारतमध्ये सुरू झालेल्या नाहीत. राम, भरतादी केवळ चारच भाऊ होते. भगवान श्रीकृष्णाच्या सोळा हजार एकशे आठ राण्यांना प्रत्येकी दहा-दहा पुत्र आणि एक-एक कन्या झाली होती. कमी अधिक प्रमाणात संततीची प्राप्ती होणे ही गोष्ट सर्वस्वी निसर्गावर (परमेश्वरावर) अवलंबून आहे.

**प्रश्न**—मुलेबाळे अधिक असतील तर त्यांचे पालन-पोषण करण्यातच सर्व वेळ खर्च होईल. तर मग परमेश्वराचे भजन-ध्यान इत्यादी केंव्हा व कसे करावे?

**उत्तर**—आपण अधिक प्रमाणात मुले जन्माला घालावित असा आमचा उद्देश (सांगण्याचे तात्पर्य) नाही. आमचे म्हणणे असे आहे की, आपण कृत्रिम उपायांनी संतती-नियमन करून-

थोड्याशा सुखाकरीता आपले शरीर, बल उत्साह इत्यादीचा नाश करून घेऊ नका, शेती कराल; नांगर हाकाल, परंतु जमीनीमध्ये बीज पेरणी करणार नाही तर त्याला 'बुद्धीवान' म्हणता येणार नाही. '**हतं मैथुनमप्रजम्**'—संतती उत्पन्न होत नसेल तर स्त्रीसंग करणे व्यर्थ होय. त्यामुळे आमचे म्हणणे असे आहे की तुम्ही इंद्रियांचे गुलाम बनू नका; त्यांच्या वशीभूत होऊ नका; उलट स्वतंत्र रहा.

**प्रश्न**—जास्त मुलेबाळे तर नकोत, परंतु मनावर ताबा देखील ठेवल्या जात नाही, तर अशा परिस्थितीमध्ये काय करावे?

**उत्तर**—असे होऊ शकत नाही. आपण जर मनावर ताबा ठेवू इच्छित असाल तर अवश्य ताबा ठेवल्या जाईल. बऱ्याच वर्षापूर्वी मी 'ब्रम्हचर्य हेच जीवन' अर्थात 'वीर्यनाश हाच मृत्यु' हे पुस्तक वाचले होते. त्या पुस्तकाचे लेखक स्वामी शिवानंद हे आहेत. त्या पुस्तकामध्ये त्यांनी लिहिले आहे की 'मी विवाहित आहे परंतु आम्ही दोघांनीही-(पति-पत्नीनी) विचार-विमर्श करून ब्रम्हचर्याचे पालन केले. त्यामुळे आम्हाला फार लाभ झाला. तसाच लाभ सर्वांना व्हावा या दृष्टीने मी हे पुस्तक लिहिले आहे. एका स्त्रीने आम्हाला सांगितले होते की, आमच्या शेजारी एक जैनाचे कुटुंब राहत असे. रोज रात्री त्यांच्या गप्पा-गोष्टी आम्हाला ऐकू येत असत. एके दिवशी मी त्यांना विचारले की तुम्ही रात्री गप्पा-गोष्टी करता; झोप घेत नसता काय?

त्यांनी सांगितले की विवाहापूर्वी आम्हा दोघापैकी एकाने कृष्णपक्षामध्ये व एकाने शुक्लपक्षामध्ये ब्रम्हचर्याचे पालन करण्याची शपथ घेतलेली आहे. आता विषयोपभोगाकरीता तिसरा पक्ष कोठून आणावा? त्यामुळे एका खोलीमध्ये राहून देखील आम्ही आपसात धर्मचर्चा करीत असतो. तात्पर्य असे

आहे की गृहस्थाश्रमी व्यक्ती देखील 'संयम' ठेवू शकतात. आपण हिंमत हारू नका. तुम्ही संयम ठेवणार नाही तर कोण ठेवणार? हिंमत्तीच्या योगाने अनेक प्रकारची अशक्य कामे देखील शक्य झालेली आहेत. शक्य होत असतात—

**हिंम्मत मत छाँड़ो नराँ, मुख ते कहताँ राम।**
**हरिया हिम्मत से किया, ध्रुव का अटल धाम॥**

त्यामुळे उत्साहपूर्वक भगवंतावर भरवसा ठेवून भगवंताची प्रार्थना करा की 'हे परमेश्वरा, आम्ही संयमित जीवन जगण्याची प्रतिज्ञा करीत आहोत त्याकरीता आम्हाला शक्ती प्रदान करा. असा विचार करून आपण जितके तत्पर रहाल, परमेश्वरावर विश्वास ठेवाल, तितका आपणाला अलौकिक चमत्कार अनुभवायास मिळेल; आपण प्रयोग करून पहावा.

पूर्वीच्या काळी लोक नसबंदी इत्यादी प्रकारच्या संतती प्रतिबंधक शस्त्रक्रिया करीत नव्हते. त्यावेळी लोक संयमपूर्वक वागत असत; तसेच आज-देखील आपण संयमपूर्वक वागू शकतो. वर्तमान काळात संयमादि गुणांना, दैवी संपत्तीनां, आपल्या अंगी बाणविण्यामध्ये जी अडचण अनुभवायास मिळते त्याचे कारण असे आहे की, आपण अगोदरच आपले जीवन असंयमित व स्वैर विचारांचे बनविलेले आहे.

थोडासा विचार करा, आपणाला असे दिसून येईल की एखादा सत्यवचनी (नेहमी खरे बोलणारा) मनुष्य आहे; त्याला 'खोटे' बोलण्या करीता एक हजार रूपये देतो असे म्हणा; तरीही तो मुळीच खोटे बोलणार नाही. परंतु ज्या लोकांना खऱ्याखोट्याचे काही सोयीर सुतक (पर्वा) नाही त्यांना म्हटले की 'आम्ही तुम्हाला पाच रूपये देऊ, आपण खरे काय आहे ते सांगा तर ते आपणाला खरे-खरे सांगून देतील. जे व्यक्ती शुद्ध शाकाहारी

आहेत त्यांना कितीही पैसे दिले तरी ते प्रसंगी मरून जातील परंतु मांस खाणार नाहीत. परंतु जे मांसाहारी आहेत त्यांना असे म्हणा की, आपण इतरत्र कोठेही जेवण न करता आमच्याकडेच शुद्ध शाकाहारी भोजन घेत चला त्याबद्दल आम्ही तुम्हाला दररोज एक रूपया देऊ, तर ते महिनाभर आपणाकडे भोजन करू शकणार नाहीत. ज्यांना दारू पिण्याचे व्यसन नाही ते कोणत्याही परिस्थितीत (भय, लोभ, प्रलोभन इत्यादी) मुळीच दारू पिणार नाहीत; परंतु ज्यांना दारू पिण्याचे व्यसन आहे ते देखील सत्संग, आरोग्य लाभावे म्हणून दारूचे व्यसन सोडून देतात. तात्पर्य असे आहे की, खरें बोलणे, मांस-मदिरादी दुर्व्यसनांचा अंगिकार करणे अवघड आहे. त्या-प्रकारे संयमाचा त्याग करणे कठीण आहे; 'संयम' करणे कठीण नाही. ही गोष्ट अनुभव सिद्ध आहे.

यामध्ये दुसरी एक महत्वाची गोष्ट अशी आहे की संयम 'स्वयंसिद्ध' आहे आणि असंमय 'कृत्रिम' आहे बनावटी आहे. स्वयंसिद्ध गोष्ट कठीण का वाटते-याकडे थोडे लक्ष द्या. जे लोक संयमाचा त्याग करून आपले जीवन असंयमी बनवितात त्यांच्या-करीता मग संयमित जीवन जगणे कठीण होऊन जाते. जर पूर्वीपासूनच आपले जीवन संयमित ठेवले तर दुर्व्यसनांचा, दुर्गुणांचा त्याग झाल्यामुळे मनुष्याच्या ठिकाणी उत्साह, धैर्य, शांती इत्यादी सद्‌गुणांचा वास होतो. आपण कांही दिवस सत्संग करा, संयमित जीवन जगा; संयमामुळे होणारे लाभ आपणाला प्रत्यक्ष अनुभवायास मिळतील. जगामध्ये जे काही रोग आहेत त्यापैकी बहुतेक रोग असंयमी व्यक्तीलाच होत असतात. संयमी लोक फार कमी प्रमाणात रोगांना बळी पडलेले दिसतात. संयमी लोक निश्चिंत व तणावरहित जीवन जगताना दिसतात तर असंयमी लोक चिंतायुक्त, भयावह व धास्तावलेले जीवन

जगतांना दिसतात. याबाबत असंयमी रावणाचे उदाहरण देता येईल. तो जेंव्हा सीतेचे अपहरण करण्याकरीता जात असतो तेंव्हा भयभीत होऊन इकडे तिकडे पाहत असतो—**सो दससीस स्वान की नाईं। इत उत चितइ चला भड़िहाईं॥** (मानस, अरण्य० २८।५) परंतु संयमी सीता राक्षसाच्या नगरीमध्ये, राक्षसांच्या वेढ्यात बसूनही निर्भय होती. एकटी व स्त्री जातीची असून देखील तिच्या मनात कोणाविषयी भीती नव्हती. इतकेच नव्हे तर ती प्रत्यक्ष रावणाला देखील अधम, निर्लज्ज, इत्यादी शब्दांनी टोचून बोलत असे व त्याला धूडकावून लावित असे— '**सठ सूनें हरि आनेहि मोही। अधम निलज्ज लाज नहिं तोही॥**' (मानस, सुन्दर० ९। ५)

आमच्या शस्त्र-पुराणे व धर्मग्रंथामध्ये ब्रम्हचर्याचे फार महात्म्य वर्णन केले आहे; आणि विदेशातील विचारवंतांनी देखील या विचार सरणीचा आदर केला आहे. त्यांनी तर असेही म्हटले आहे की संपूर्ण आयुष्यातून फक्त एकच वेळ पुरुषाने स्त्री संभोग करावा. यावर समाधान होत नसेल एका वर्षामध्ये एक वेळ स्त्री संभोग करावा. एवढ्यानेही समाधान होत नसेल तर प्रत्येक महिन्याला एक वेळ स्त्री संभोग करावा म्हणजेच केवळ 'ऋतुगामी' बनावे; आणि एवढ्यानेही समाधान होत नसेल तर प्रथम स्वतःची कबर बांधून ठेवावी व वाटेल तेंव्हा स्त्री-संभोग करावा; कारण नेहमी स्त्रीसंभोग केल्यामुळे मनुष्य अल्पायुषी ठरतो. अल्पायुषामध्येच मृत्यु येण्याची अनेक कारणे आहेत परंतु 'वीर्यनाश' हे त्यापैकी एक प्रमुख कारण आहे. त्यामुळे दीर्घायुषी होण्याकरीता, उतम स्वास्थ्याकरीता, आणि निरोगी राहण्याकरीता ब्रम्हचर्याचे पालन करणे अत्यंत आवश्यक आहे. सिंह संपूर्ण आयुष्यभरात केवळ एकच वेळ सिंहिणीसोबत

संग करतो* त्यामुळे सिंहाचे वीर्यरक्षण विशेष प्रमाणात होत असल्यामुळे त्याच्या ठिकाणी विशेष तेज असते; आणि तो आपल्या—पेक्षा मोठ्या असलेल्या हत्तीला देखील मारू शकतो. वेळोवेळी स्त्रीसंभोग करणाऱ्या पुरुषाच्या ठिकाणी ते 'तेज' असत नाही; त्याऐवजी त्याच्या ठिकाणी दौर्बल्य दिसून येते.

ब्रम्हचर्याचे पालन करणाऱ्या व्यक्तीला भयंकर समजले गेलेले रोग देखील होत नाहीत. त्या व्यक्तीची संतती देखील निरोगी व तेजस्वी असते; परंतु ब्रम्हचर्याचे पालन न करणाऱ्या व्यक्तीची मुले तेजस्वी आणि निरोगी असू शकत नाहीत. कारण वेळोवेळी केलेल्या मैथुनामुळे रज-वीर्य क्षीण व शक्तीहीन होऊन जाते. भोगासक्तीपोटी जी मुले जन्माला येत असतात ती देखील भोगी व रोगीच जन्मतात. त्यामुळे धर्मभावनेला प्राधान्य देऊनच संतानोत्पती करावयास पाहिजे; म्हणजे ती संतती देखील धर्मपरायण व निरोगी होईल. भगवंतानी देखील धर्मपूर्वक कामालाच आपले 'स्वरूप' असे म्हटले आहे. '**धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ**' (गीता ७।११)

जो (मनुष्य) शास्त्रमर्यादेनुसार केवळ संतानोत्पती—करीताच ऋतुकाळीच स्त्रीसंग करतो तो गृहस्थाश्रमामध्ये राहत असूनही त्याला 'ब्रह्मचारी' च मानले जाते, परंतु जे केवळ भोगेच्छा आणि सुखेच्छा मनात ठेवून स्त्रीसंग करतात ते पापच करीत असतात. गीतेमध्ये तर विषयोपभोगाचे केवळ चिंतन होणे याला देखील पाप म्हटले आहे. (२।६२-६३) आणि '**कामाला**' संपूर्ण पापाचे मूळ आणि नरकाचे द्वार असे म्हटले आहे. (३।३७; १६।२१) तात्पर्य

* सिंह गमन, सज्जन वचन, कदलि फलै इक बार।
तिरिया तेल, हम्मीर हठ, चढै न दूजी बार॥

असे आहे की, केवळ भोगेच्छेपोटी स्त्रीसंग करणे हेच नरकाचे द्वार आहे; पापांचे व अन्यायाचे कारण आहे. अनर्थांचे कारण आहे.

मनाचा ठाम निर्धार केला असता ब्रम्हचर्याचे पालन करणे फार सोपे आहे. ब्रम्हचर्याचे पालन करणे ही मनुष्याकरीता अत्यंत महत्वाची गोष्ट आहे. जर मनुष्य संयम ठेवणार नाही तर त्याला पशुपेक्षाही निम्न श्रेणीमध्ये बसवावे लागेल. पशुमध्ये गाढव, कुत्रा इत्यादी प्राण्यांना निम्न श्रेणीचे मानले जाते; परंतु वर्षा काळी केवळ एकाच विशिष्ट महिन्यात त्यांचा प्रजनन काळ असतो. त्या महिन्यामध्ये जर आपण त्यांना रोखून धरले तर त्यांचा पूर्णपणे संयम होऊन जातो; उदाहरणार्थ-श्रावण महिन्यात गाढवांना; कार्तिक महिन्यात कुत्र्यांना, आणि माघ महिन्यात मांजरांना रोखून धरले तर, त्यांच्याकडून ब्रम्हचर्याचे पालन करवून घेतले तर त्यांचा पूर्णपणे संयम होऊन जातो. परंतु मनुष्य बाराही महिने मुक्त असल्यामुळे त्याचे रक्षण (स्वत:शिवाय) कोणीही करू शकत नाही. त्याच्या स्वत:च्याच मनात आले तरच तो स्वत:वर संयम ठेवू शकतो. याकरीताच शास्त्रामध्ये मनुष्याला ब्रम्हचर्याचे पालन करण्याविषयीची आज्ञा दिलेली आहे. ब्रम्हचर्याचे पालन केल्यामुळे मनुष्याला ब्रम्हविद्येची प्राप्ती होत असते; परमानंदाची प्राप्ती होत असते.

**प्रश्न**—पुरुष संयम ठेविल, परंतु जर स्त्री संयम बाळगणार नाही तर काय करावे?

**उत्तर**—स्त्री संयम ठेवणार नाही असे कधीही होत नाही; वास्तविक दृष्ट्या पुरुषच स्त्रीला बिघडवित असतो; कारण स्त्रीयांच्या ठिकाणी काम वेगाला रोखण्याची जितकी शक्ती असते तितकी पुरुषांच्या ठिकाणी नसते.

जर पूर्वीपासूनच संयम बाळगला तर संयम पाळणे सोपे

जाते. भोगवृत्ती जास्त प्रमाणात बळावली तर संयम ठेवणे कठीण जाते. त्यामुळे जेंव्हा कामावेग नसेल तेंव्हा दोघांनीही—स्त्रीपुरुषांनी—शांततेने विचार करून असा संकल्प करावा की, आपणाला जास्त मुले नकोत तर मग आपण संयमाने वागावयास पाहिजे. त्यामुळे आरोग्यदेखील उत्तम राहील. असा विचार करून दोघांनीही रात्रीच्या वेळी वेगवेगळे रहावे.

मनुष्य संयम 'नेहमी करीता' ठेवू शकतो परंतु नेहमीकरीता भोग भोगू शकत नाही ही गोष्ट स्वयंसिद्ध आहे. त्यामुळे संयम बाळगण्याच्या बाबतीत हिंमत न हारता गर्भपात, नसबंदी सारख्या महापापापासून स्वत:ला वाचवावयास पाहिजे.

जोपर्यंत हा हिन्दू-समाज गर्भपातादी महापापापासून स्वत:ला वाचवणार नाही तोपर्यंत त्याचा उद्धार होणे शक्य नाही; कारण आपले पापच आपल्या नाशाला कारणीभूत होत असते. जर हिंदू समाजाला आपल्या उन्नतीची आणि विकासाची इच्छा असेल तर या घोर महापापापासून—ब्रम्हहत्येपेक्षा दुप्पट समजल्या गेलेल्या पापापासून-स्वत:ला वाचवावयाल पाहिजे. एका डॉक्टर बांधवाने आम्हाला सांगितले की गतवर्षी आपल्या भारत देशामध्ये जवळ जवळ एकवीस लाख गर्भपात झाले (केल्या गेले) आहेत. अशा लोक-परलोकाला नष्ट करणाऱ्या महान हत्येमुळे समाजाची काय दुर्दशा होईल हे केवळ भगवंतच जाणे! धर्मपरायण अशा भारतदेशामध्ये हे केवल धर्मविरोधी कृत्य होत आहे, याचा पारावार नाही. त्याबद्दलचे फार गंभीर परिणाम सर्वांना भोगावे लागतील म्हणून वेळीच सावध व्हावयास पाहिजे—

**का बरषा सब कृषी सुखाने।**
**समय चुकें पुनि का पछिताने॥**

आमचा उद्देश्य कोणाची निंदा करण्याचा नाही; कोणालाही निम्नश्रेणीमधील समजण्याचा नाही. आमचे म्हणणे असे आहे की मनुष्य शरीरामध्ये येऊत कमीत कमी गर्भपातासारख्या महापापापासून तरी स्वतःला वाचवा.

**बडे भाग मानुष तनु पावा। सुर दुर्लभ सब ग्रंथन्हि गावा॥**

(मानस, उत्तर ४३। ४)

**कबहुँक करि करुना नर देही।**
**देत ईस बिनु हेतु सनेही॥**

(मानस, उत्तर ४४। ३)

**'दुर्लभो मानुषो देहो देहिनां क्षणभंगुरः।'**

(श्रीमद्भा ११। २। २९)

**लब्ध्वा सुदुर्लभमिदं बहुसम्भवान्ते**
**मानुष्यमर्थदमनित्यमपीह धीरः।**

(श्रीमद्भा ११। ९। २९)

—अशा प्रकरे ज्या मनुष्य शरीराला एवढे 'दुर्लभ' म्हटले गेले आहे त्या मनुष्य शरीरामध्ये जीवाला येऊ न देणे, जीवाला असे हे दुर्लभ शरीर न मिळू देणे हे केवढे महापाप आहे. अशा महापापापासून सावधान!



# ७. भांडण-तंट्यावर तोडगा

**प्रश्न**—कुटुंबामध्ये भांडण-तंटा कलह, अशांती इत्यादी उत्पन्न होण्याची काय कारणे आहेत?

**उत्तर**—प्रत्येक जण आपल्या मनाप्रमाणे करू इच्छितो; आपल्या अनुकूलतेचाच विचार करतो. स्वतःच्या सुखाची आणि आरामाची इच्छा करतो; स्वतःच्या मोठेपणाची इच्छा करतो; आपला स्वार्थ साध्य करू पाहतो—अशा अनेक प्रकारच्या वैयक्तिक स्वार्थामुळेच कुटुंबामध्ये भांडण-तंटे, कलह, अशांती इत्यादी उत्पन्न होतात. ज्याप्रमाणे दोन कुत्रे आपसात फार प्रेमाने खेळतात; परंतु भाकरीचा तुकडा त्यांच्या समोर येताच त्यांचे भांडण सुरू होते; यावरून भांडणतंट्याचे कारण 'भाकरीचा तुकडा' हे नसून वैयक्तिक 'स्वार्थ' हे आहे.

कुटुंबामधील जी व्यक्ती आपल्या वैयक्तिक सुखाची इच्छा करते त्या व्यक्तीला कुटुंबातील 'सदस्य' म्हणता येणार नाही; तिला केवळ एक व्यक्ती म्हणता येईल. कुटुंबातील सदस्य त्यालाच म्हणता येईल की, जो कुटुंबातील लहान-मोठ्या सर्वच प्रकारच्या व्यक्तीचे हित करीत असतो आणि नेहमी हितच इच्छित असतो.* म्हणून जो मनुष्य आपल्या कुटुंबामध्ये शांती नांदावी अशी इच्छा करतो त्याने आपल्या 'कर्तव्याकडे' आणि दुसऱ्यांच्या अधिकारांकडे पहावयास पाहिजे. म्हणजेच स्वतःच्या

---

* अयं निजः परो वेति गणना लघुचेतसाम्।
उदारचरितानां तु वसुधैव कुटुम्बकम्॥

"हे 'आपले' आहे, आणि हे 'दुसऱ्याचे' आहे" अशा प्रकारचा विचार संकुचित भावना असणारे लोकच करीत असतात. उदार व्यक्तीच्या दृष्टीकोनातून तर संपूर्ण विश्वच आपल्या 'कुटुंबाप्रमाणे' आहे.

कर्तव्याचे पालन आणि दुसऱ्यांच्या हिताचे रक्षण करावयास पाहिजे. दुसऱ्यांचा आदर-सत्कार करावयास पाहिजे, दुसऱ्यांना सुख द्यावयास पाहिजे.

**प्रश्न**—घरामधील भाऊ-भाऊ आपसांमध्ये भांडण करीत असतील तर आई-वडीलांनी काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा वेळी आई-वडीलांनी 'न्याययुक्त' गोष्टी सांगाव्यात त्यांनी लहान मुलांना असा उपदेश करावा की, तुम्ही भरत, लक्ष्मण, आणि शत्रुघ्न यांची चरित्रे पहा. ते आपल्या वडील बंधूसोबत (रामासोबत) कसे वागत होते. भीम, अर्जुन इत्यादी-चे युधिष्ठिरा-सोबतचे वर्तन कसे होते. जेष्ठ पुत्रांना सांगावे की, तुम्ही रामाचे चरित्र पहा. श्रीराम आपल्या लहान बांधवांना कोणत्या प्रकारची वागणूक देत होते. याकरीता गीताप्रेस मधून प्रकाशित झालेल्या 'तत्त्व चिन्तामणी' नावाच्या ग्रंथाच्या दुसऱ्या भागामधील 'रामायणमें आदर्श भ्रातृप्रेम' या नावाचा लेख मनपूर्वक वाचावयास पाहिजे. आणि युधिष्ठिर आपल्या लहान बांधवाला कोणत्या प्रकारची वागणूक देत होते. तरी तुम्ही सर्वजण त्यांची आदर्श चरित्रे आचरणात आणण्याचा प्रयत्न करा.

**प्रश्न**—जर बहीण-भाऊ आपसात भांडत असतील तर आई-वडीलांनी काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—आई-वडीलांनी मुलीची बाजू घ्यावयास पाहिजे. कारण ती सुवासिनी असते. दानास पात्र असते.* थोडे दिवस राहणारी आहे. म्हणून ती आदरणीय आहे. मुलगा तर घराचा मालक असतो; तो घरातच राहणारा असतो मुलाला एकांती बसवून समजावयास पाहिजे की, मुला, आपल्या बहिणीचा अनादर करू

* बहीण, मुलगी आणि जावयांना भोजन देण्याचे पुण्य ब्राम्हण भोजन केल्याप्रमाणे मिळत असते

नये. ती कांही तुझ्या घरी कायमची राहणारी नाही; ती तर एक दिवस आपल्या घरी जाणार आहे. तू तर या घराचा मालकच आहेस.

बहिणीने आपल्या भावाकडून कोणत्याही प्रकारची अपेक्षा ठेवू नये. भाऊ जेवढे देईल त्यापेक्षा थोडे कमीच घ्यावे. तिने असे मानावे की, भावाच्या घरून आणलेल्या वस्तु, संपत्तीने आपले किती दिवस भागणार, आपणाला तर आपल्या घरच्याच भरवशावर निभाव करावयाचा आहे.

**प्रश्न**—मुलगा आणि सून हे आपसात भांडत असतील तर आई-वडीलाने काय करावे?

**उत्तर**—आई-वडीलांने त्या दोघाचीही अशा प्रकारची समजूत घालावी की, आम्ही किती दिवस टिकणार? या घराचे मालक तर आपणच आहात. जर आपणच आपसात भांडत असाल तर आपल्या कुटुंबाचे पालन-पोषण कोण करेल.? कारण कुटुंबाचा संपूर्ण भार तर आपणावरच आहे.

मुलाला एकांतात घेऊन समज द्यावी की, हे प्रिय पुत्रा, तुझ्याकरीताच तुझ्या प्रिय पत्नीने माता-पिता, बंधू-भगिनी इत्यादीचा त्याग केला आहे. तू तर आपल्या वडिलाच्याच घरी आहेस; तू कशाचा त्याग केला आहे.? म्हणून अशा त्यागमूर्ती स्त्रीला तन-मन-धनाने प्रसन्न ठेवणे, तिचे पालन करणे हेच तुझे एकमेव कर्तव्य आहे. परंतु एक गोष्ट मात्र जरूर लक्षात ठेव की कोणत्याही परिस्थितीमध्ये बायकोचा गुलाम होऊन जीवन जगू नको. ज्यामध्ये आपले कल्याण होईल ते काम आसक्तीरहित होऊन कर. संपूर्ण प्राणीमात्राचे कल्याण करणे हे मनुष्याचे कर्तव्य आहे. तू जर केवळ एका पत्नीचेही कल्याण करणार नाही तर मग तुझ्या जीवनात काय अर्थ राहिला.?

आपल्या सुनेला समज द्यावी की मुली, तू केवळ पतिकरीताच

आपल्या माता-पिता, भाऊ-भावजया, इत्यादीचा त्याग केला आहे, तेंव्हा आता त्यालाही (पतिलाही) खुष ठेवू शकत नाहीस, त्याचीही सेवा करू शकत नाहीस तर मग दुसरे काय करशील? कोणी पूर्ण समुद्र पोहून जाईल आणि किनाऱ्याजवळ येऊन बुडेल तर ती किती शरमेची गोष्ट होईल; तुला केवळ जीवनभर एकच व्रत पाळावयाचे आहे—

**एकइ धर्म एक ब्रत नेमा। कायँ बचन मन पति पद प्रेमा॥**

(मानस, अरण्य० ५।४)

**प्रश्न**—नणंद-भावजया आपसात भांडत असतील तर आईवडीलांनी काय करावे?

**उत्तर**—आईने आपल्या मुलीला समज द्यावी की, बघ बेटी, ही (भावजय) तर नवीन (आजकालची) मुलगी आहे, तिने तुला कांहीही म्हटले तरी तू तिला जेष्ठ समजून तिचा आदर कर. ही आपल्या घराची मालकीण आहे म्हणून तू माझ्यापेक्षा ही अधिक प्रमाणात तिचा आदर कर. तू माझा आदर नाही केला तरी तुझ्यावरील प्रेमामुळे मी तुझ्यावर नाराज होणार नाही. कारण तू माझी मुलगी आहेस.

भावजयीने देखील आपल्या नणंदेचा अधिक प्रमाणात आदर करावा. कारण ती पाहुण्याप्रमाणे केवळ कांही दिवसाकरीता घरात राहणारी आहे. भावजयीने नणंदेच्या मुलाबाळावर स्वतःच्या मुलाबाळापेक्षा अधिक प्रेम करावे.* मुले खुष राहत असतील तर पर्यायाने त्यांची आई देखील खुष राहत असते—असा सिद्धांत

* भावजयीने सर्वाधिक (प्रथम क्रमांकावर) प्रेम आपल्या नणंदेच्या मुलाबाळावर करावे; त्यानंतर द्वितीय क्रमांकावर आपल्या दिराच्या मुलाबाळावर प्रेम करावे; तृतीय क्रमांकावर आपल्या जावेच्या मुलाबाळावर प्रेम करावे, चतुर्थ क्रमांकावर प्रेम आपल्या सासूच्या मुलाबाळावर करावे आणि पांचव्या क्रमांकावर प्रेम आपल्या (स्वतःच्या मुलाबाळावर करावे).

आहे. अशाप्रकारे भावजयीने आपल्या नणंदेला खुष ठेवावे. दुसऱ्याला खुष ठेवण्यामध्ये स्वत:चे देखील कल्याण सामावलेले असते.

मुलीवरील प्रेमापोटी आई आपल्या मुलीला कांही देऊ इच्छित असेल तरीही मुलीने त्याचा स्विकार करू नये. मुलीने आईला म्हणावे की, जर माझी भावजय देईल तरच मी घेईन. जर तू तिच्या पश्चात मला कांही देशील तर भावजयीला वाईट वाटेल आणि ती तुझ्यासोबत भांडण करेल; त्यामुळे तुझ्या घरात भांडण लावण्याकरीता थोडीच मी या ठिकाणी आलेली आहे. आई! जर मी तुझ्याकडून कांही घेईन तर ते 'थोडे' दिवस मिळेल; परंतु भावजयीने दिले तर पुष्कळ दिवस मला मिळत राहील. म्हणून त्यागाच्या दृष्टीने, व्यवहाराच्या दृष्टीने; आणि स्वार्थदृष्टीने भावजयीच्या मतानुसारच घेणे योग्य आहे.

**प्रश्न**—मोठा भाऊ आईवडीलांसोबत भांडण करीत असेल तर लहान भावाने काय करावे ?

**उत्तर**—लहान भावाने आपल्या मोठ्या भावाच्या चरणी प्रणाम करून त्याला अशी विनंती करावी की, दादा, आपण जर अशा प्रकारचे वर्तन कराल तर आम्ही कोणाचा आदर्श समोर ठेवून जीवन जगावयाचे ? म्हणून आपण आमच्यावर कृपा करून आपल्या आई-वडीलासोबत आदर्श वर्तन करा. यामुळे आपला दोन्हीकडून ही फायदा होईल. एक तर आपल्या चांगल्या वर्तणुकीचा कुटुंबीयावर, आपल्या गल्लीतील लोकांवर चांगला परिणाम पडेल. आणि दुसरे म्हणजे आपली सद्वर्तणुक पाहून आम्ही देखील तसेच वर्तन करू, पर्यायाने त्याचे पुण्य तुम्हालाच मिळेल. म्हणून आपसी वर्तणुक नेहमी आदर्श असावी. मी तर आपणाला केवळ विनंतीच करू शकतो. कारण आपण आम्हाला पित्यासमान आहात.

**प्रश्न**—लहान भाऊ आईवडीलासोबत भांडत असेल तर मोठ्या भावाने काय करावे ?

**उत्तर**—मोठ्या भावाने लहान भावांना समज द्यावी की, पहाबंधू! मी आणि आपण सर्व मुले आहोत. आईवडील हे आपणाकरीता सदासर्वदा आदरणीय आणि पूज्यनीय आहेत. ज्या शरीराच्या योगाने आपण भगवत्प्राप्ती-करून घेऊ शकतो ते शरीर आपणाला माता-पित्याकडूनच मिळालेले आहे. आपण त्यांच्या या कर्जाची कधीही परतफेड करू शकत नाही. याकरीता आपण जर त्या मतानुसार वर्तन करू तर आई वडील खुष होतील, आणि आपणावर असलेले ऋण माफ होऊ शकेल. आपण आपल्या चामड्याचे जोडे करून जरी त्यांच्या पायात घातले तरीही त्यांच्या ऋणातून मुक्त होऊ शकत नाही; कारण तो चमडा (कातडे) देखील कोणापासून प्राप्त झालेला आहे ? त्यांच्यापासूनच मिळालेली वस्तु आपण त्यांना दिली, आपण आपल्याजवळचे काय दिले ? त्यांचीच वस्तु असून आपण तिला आपली मानतो हीच तर आपली चूक आहे. आईवडील जसे वाटेल तसे आपणाला ठेवतील, त्यांचा आपल्यावर पूर्णपणे अधिकार आहे.

**प्रश्न**—जर बहीण आई—वडीला सोबत भांडत असेल तर भावाने काय करावे ?

**उत्तर**—भावाने न्यायाची गोष्ट करून बहिणीची बाजू घ्यावी आणि आईवडीलांना सांगावे की ही तर केवळ पाहुण्याप्रमाणे आपल्या घरी आलेली आहे. तिचे कोडकौतुक करावयास पाहिजेत. परंतु बहीण अपराधी असेल तर तिला एकांतात समज द्यावी की, बाई! आपसातील प्रेमाचेच महात्म्य वर्णन केल्या जाते; भांडण-तंट्याचे नाही. आईवडील आदरणीय आहेत. म्हणून तू आणि आम्ही मिळून सर्वजण आईवडीलांचा आदर करू. संसारातील तुच्छ आणि गौण वस्तुकरीता आईवडीलांचा अनादर का करावयाचा ?

**प्रश्न**—लहान भाऊ मोठ्या भावजयी सोबत भांडण-तंटा करीत असेल तर मोठ्या भावाने काय करावे?

**उत्तर**—मोठ्या भावाने लहान भावाची कानउघाडणी करावी की 'तू हे काय करीत आहेस'? शास्त्राच्या दृष्टीने विचार केला तर मोठी भावजय आपल्या आईसमान असते. लक्ष्मण, भरत आणि शत्रुघ्न यांचे सीते सोबतचे वर्तन कसे होते? त्यांच्या चरित्रांचे वेळोवेळी अध्ययन आणि मनन कर. त्यामुळे तुझ्या अंत:करणात शुद्ध आणि सात्त्विक भाव उत्पन्न होतील, तुझी बुद्धी देखील आपोआपच शुद्ध होऊन जाईल.

**प्रश्न**—जावा-जावा. (लहान-मोठ्या भावांच्या पत्नी) जर आपसात भांडत असतील तर भावांनी काय करावे?

**उत्तर**—प्रत्येकांनी आपापल्या पत्नीला समज द्यावी. लहान भावाने आपल्या पत्नीला अशी समज द्यावी की, "तू माझ्या जेष्ठ बांधवाना वडीला प्रमाणे आणि त्यांच्या पत्नींना आई-प्रमाणे समजावयास पाहिजे आणि त्यांचा आदर करावयास पाहिजे." जेष्ठ बांधवांनी आपल्या पत्नींना अशा प्रकारची समज द्यावी की, "तुम्ही आमच्या कनिष्ठ बांधवांना मुलाप्रमाणे आणि त्यांच्या पत्नींना मुलीप्रमाणे समजून त्यांच्यावर प्रेम करावयास पाहिजे. त्यांच्या पत्नीकडून होणाऱ्या चुकाबद्दल त्यांना क्षमा करावयास पाहिजे; कारण तुम्ही मोठ्या आहांत". जर तुम्ही त्यांना सामावून घेणार नाही तर तुम्हाला 'जेष्ठ' (मोठे) कोण म्हणेल? त्यांच्या चुका माफ केल्यामुळे, त्यांच्यावर प्रेम केल्यामुळेच तुमचे स्थान उंचावेल. राग आणणारी व्यक्ती शेवटी हारत असते आणि दुसऱ्याचा राग धैर्यपूर्वक सहन करणारी व्यक्ती शेवटी विजय मिळवित असते.

दोन्ही प्रकारच्या (जेष्ठ आणि कनिष्ठ) भावांनी अशा प्रकारचा सावधपणा ठेवावा की त्यांनी स्त्रियांच्या भांडणामध्ये स्वत:ला

गोवून घेऊ नये. स्त्रियांच्या ठिकाणी सहनशिलता कमी प्रमाणात दिसून येत असते. म्हणून भावांनी आपापल्या पत्नींची बाजू घेऊन आपसामध्ये कलह उत्पन्न करू नये. जर स्त्रियांचे आपसात पटत नसेल तर आपापला वेगवेगळा संसार करावा.* वेगवेगळे देखील प्रेमानेच व्हावे. जर वेगळे होऊनही आपसातील कलह वाढतच असतील तर वेगळे होऊन देखील काय फायदा ? म्हणून आपसातील प्रेम वृद्धींगत होण्याकरीताच एकत्र रहावे अथवा वेगवेगळे व्हावे. 'वेगळे' निघाल्यानंतर आपल्या हिस्स्या-वाट्या करीता आपसात भांडणे करू नयेत. लहान भावांनी मोठे भाऊ देतील तेवढेच घ्यावे; आणि मोठ्या भावांनी देखील लहान भावांना आपल्यापेक्षा जास्त वाटा लहान भावंडाना द्यावा, कारण ते 'कनिष्ठ' असल्यामुळे प्रेमास पात्र आहेत. आपल्या मानाने अधिक प्रमाणात देऊनही जर लहान भाऊ संतुष्ट होत नसेल तर मोठ्या भावाचे आपल्या लहान भावाचेच म्हणणे ऐकावे.

'त्यागच' सर्वश्रेष्ठ मानल्या गेला आहे. उत्पत्ती-विनाशशील' अशा तुच्छ वस्तुकरीता एकमेकांचा राग-द्वेष अथवा हेवादावा करणे ही फार मोठी चूक आहे. कारण या सर्व वस्तु येथेच राहणाऱ्या आहेत. आणि राग-द्वेषच (अंतःकरणातील स्वभावच) सोबत येणार आहेत. म्हणून मनुष्याने नेहमी सावधचित्त रहावे आणि आपले अंतःकरण कधीही मलिन होऊ देऊ नये.

**प्रश्न**—मुले आपसामध्ये भांडत असतील तर भावांनी काय करावे ?

**उत्तर**—भावांनी शक्यतोवर आपापल्या मुलांची बाजू घेऊ नये; उलट आपल्या भावांच्या मुलांची बाजू घ्यावी. जर आपल्या पुतण्यांनी अन्याय केला असेल तर शांतीपूर्वक मनाने समज

* रोजानारी राड़ आपसकी आछी नहीं, बने जहाँतक बाड़ चटपट कीजै चाकरिया।

द्यावी. तात्पर्य असे आहे की, वैयक्तीक स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग केल्या जाईल तर इतरासोबत आपोआपच चांगल्या प्रकारची वर्तणूक घडून यावयास लागेल.

**प्रश्न**—आई आणि आपली पत्नी (सासू आणि सून) आपसात भांडत असतील तर पुत्राने (मुलाने) काय करावयास पाहिजे?

**उत्तर**—अशा परिस्थितीमध्ये मुलासमोर मोठे धर्मसंकट असते. त्याने आईची बाजू घेतली तर पत्नी रडू लागते आणि पत्नीची बाजू घेतली तर आई दुःखी होते, आणि "माझा मुलगा असून माझे न ऐकता तो आपल्या पत्नीची बाजू घेतो" असे म्हणावयास लागते. अशा मुलाने विशेषत्वाने आपल्या आईचीच बाजू घ्यावी आणि आपल्या पत्नीला एकांतामध्ये अशी समज द्यावी की, "माझ्या आईप्रमाणे माझ्याकरीता आणि तुझ्याकरीता दुसरे कोणीही पूज्यनीय आणि आदरणीय नाही. तिच्या सारखी आपले कल्याण करणारी आणि कल्याण इच्छिणारी दुसरी कोणतीही व्यक्ती नाही. आई तुझ्यावर वेळप्रसंगी रागावतही असेल; परंतु ती अंतःकरणातून माझे कधीही वाईट व्हावे असे इच्छित नाही. जर तू मला प्रसन्न ठेवू इच्छित असशील अगोदर माझ्या आईला खुष ठेव. मुलाने आपल्या पत्नीच्या आहारी जाऊन तिच्या म्हणण्यानुसार आपल्या आईसोबत भांडण-तंटा करू नये; आईचा द्वेष करू नये. पत्नीचे ऐकून आई, बहीण, इत्यादी नातलगाचा तिरस्कार करणे, त्यांचा अपमान करणे हा फार मोठा अपराध आहे.

आपल्या आईला देखील समज द्यावी की, आई, ही बिचारी आपल्या आईवडील, भावा-भावजयांचा त्याग करून, (सर्वांना सोडून) आपल्या घरी आली आहे; त्यामुळे तूच तिचे कोडकौतुक करू शकतेस. तिचे दुःख ऐकून घेणारे दुसरे कोण आहे? तिने

आपले सुख-दुःख कोणाजवळ सांगावे? तूच तिच्या आई-प्रमाणे आहेस. तिच्या हातून एखाद्या वेळी तुझ्या मनाविरूद्ध वर्तन घडून आले तरीही तू ते सहन करून तिला निभावून न्यावयास पाहिजे. आपण दोघानीही जर तिच्याकडे लक्ष दिले नाही तर तिने कोठे जावे? त्यामुळे आई, तू तिला क्षमा करीत जा. मी लहानपणी कित्येक वेळा तुझ्या अंगावर मलमूत्रविसर्जन केले आहे; परंतु तू मला स्वतःचे अंगच समजून माझा कधीही राग धरला नाही; उलट मला नेहमी क्षमाच केली; मला अपराधी समजले नाही. त्याप्रमाणे माझ्या पत्नीला देखील स्वतःचे 'अंग'च समजून क्षमा करीत जा. ज्याप्रमाणे आपल्याच दातानी आपली जीभ चावल्या गेली तर दाताविषयी आपण वैरभावना मनात आणत नाही. त्यांच्यावर राग धरीत नाही; त्याप्रमाणे माझ्या पत्नीच्या हातून एखादी चूक झाली तरीही तिचा राग करू नको. माझ्यामुळे ती देखील तुझे एक 'अंगच' आहे

**प्रश्न**—पत्नी आणि सून आपसामध्ये भांडण करीत असतील तर पतिने (सासऱ्याने) काय करावे?

**उत्तर**—पतिने (सासऱ्याने) आपल्या पत्नीला धाकात ठेवून सुनेला असे आश्वासन द्यावे की मी तुझ्याविषयी तुझ्या सासूला समज देतो. आपल्या पत्नीला एकांतामध्ये अशी समज द्यावी की, हे बघ, तू तिच्या आईप्रमाणे तिला वागणूक दे. ती सर्व नातलगांना सोडून आपल्या घरी आलेली आहे. म्हणून तिच्यावर मुलीप्रमाणे प्रेम करणे, तिचे पालन करणे हे तुझे कर्तव्य ठरते. ती आपले सुख-दुःख तुझ्या शिवाय कोणाजवळ सांगेल? स्वतःचा आधार आणि आश्रय कोणाला समजेल?

सुनेला अशी समज द्यावी की, बघ मुली, सासू जे करते ते तुझ्या हिताचेच करते. पुत्र जन्माला येतो तेंव्हापासून ती अशी

आशा करीत असते की, मला सून येईल, माझे म्हणणे ऐकेल, माझी सेवा करील! त्यामुळे ती आपल्या सुनेविषयी वाईट भावना कशी काय करू शकेल? तू लहान असल्यामुळे, तुझ्या मनाप्रमाणे येत नसल्यामुळे तुला सासूचे वर्तन अप्रिय वाटते. मुली, तू आपल्या सर्व नातलगांना सोडून या ठिकाणी आली आहेस; त्यामुळे तू काय केवळ एका सासूला खुष ठेवू शकत नाही.! सासू आता आणखी किती दिवस वाचणार (जगणार) आहे? या घराची मालकीण तर एक दिवस तूच होणार आहेस. तुम्हा दोघींचे भांडण जर कोणी बाहेरील सद्‌गृहस्थ ऐकतील तर ते जास्त दोष तुलाच देतील. ज्याप्रमाणे वृद्ध व्यक्ती आणि लहान मुले आपसात भांडत असतील तर दोष लहान मुलाचाच मानला जातो. त्यामुळे या सर्व गोष्टीचा विचार करता तू आपली वर्तणुक सुधारावयास पाहिजे. त्यामुळे सासूला देखील आनंद होईल. सासू एखादे वेळी टोचून बोलली तरी तूच तिच्या पाया पडून तिला क्षमा मागावयास पाहिजे. त्यामुळे सासूवर तुझा प्रभाव पडेल. आणि घरामध्ये शांती नांदेल. तू केवळ एकटी बिघडली तर पूर्ण घरामध्ये अशांती माजेल. घरामधील अशांतीचे कारण तू का बनतेस? तू जेष्ठ व्यक्तीच्या आज्ञेचे पालन कर, सकाळ संध्याकाळ त्यांचे दर्शन घे. सासू कधी घालून-पाडून बोलली तरीही तिचा प्रत्यक्ष विरोध करू नको. जेंव्हा ती शांत होईल तेंव्हा आपले मनोगत शांततेने तिच्याजवळ कथन कर; तिने ऐकले तरी ठीक; नाही ऐकले तरीही ठीक; परंतु असे केल्याने कोणीही तुला मुळीच दोष देणार नाही.

**प्रश्न**—वडील आणि आई जर आपसात भांडत असतील तर मुलाने काय करावे?

**उत्तर**—शक्यतोवर मुलाने आपल्या आईची बाजू घ्यावी. परंतु वडीलांना याचा पता लागू देऊ नये. वडीलांना सांगावे की पिताजी,

आपण आम्हा सर्वांचे पालनकर्ते आहात. आईला जर कांही सांगावयाचे असेल तर ती तुमच्या जवळच सांगेल. आपणाशिवाय तिचे म्हणणे दुसरे कोण ऐकणार? विवाहाच्या वेळी आपण अग्नी आणि ब्राम्हणासमक्ष दिलेल्या वचनांचे पालन करावयास पाहिजे. आई आपले वचन निभावित आहे की नाही याकडे आपण लक्ष न देता आपले कर्तव्य पार-पाडीत राहिले पाहिजे. आपण 'मर्यादा' ओलांडणार नाही तर माझे आणि माझ्या आईचे लोक-परलोक हे दोन्हीही सुधारतील. नाही तर आम्ही कोठे जावे? आपल्यावाचून आमची दशा काय होईल? मी आपणाला शिकवण देत नसून केवळ आठवण करून देत आहे. माझे म्हणणे आपणाला आवडत नसेल तर आपण मला क्षमा करावयास पाहिजे. कारण आपण माझ्यापेक्षा मोठे आहात—**क्षमा बडनको चाहिये, छोटनको उत्पात। कहा विष्णुको घट गयो, जो भृगु मारी लात॥** भृगुने छातीवर लात मारल्यामुळे श्रीविष्णुची महिमा कमी न होता ती उलट वाढली. त्यामुळे यावर आपण स्वतःच विचार करा. मी आपणाला काय सांगू. आपण स्वतःच सर्व कांही जाणू शकता.

कुटुंबामध्ये भांडण तंटा होऊ नये—याकरीता कुटुंबातील प्रत्येक व्यक्तीने आपल्या अधिकाराचा त्याग आणि दुसऱ्यांच्या अधिकाराचे रक्षण करावे. आपला आदर-सत्कार व्हावा असे प्रत्येकाला वाटते. त्यामुळे दुसऱ्यांचा आदर-सत्कार करावयास पाहिजे.

**प्रश्न**—जर सासू आपल्या मुलाची बाजू घेऊन सुनेला त्रास देत असेल तर सुनेने काय करावे?

**उत्तर**—सुनेने असे समजावे की, हे तर घरांचे मालक आहेत. मी तर दुसऱ्या घरून येथे आली आहे. त्यामुळे त्यांची कांहीही केले तरी चालेल; परंतु ते खुष राहतील असेच वर्तन मला करावे लागेल. सुनेने सासूला चांगली वागणूक द्यावी; तिचा द्वेष कधीही

करू नये. तिच्या भावनांचे रक्षण करून आपल्या मनातील भावना मलिन होऊ देऊ नयेत. सुनेने भगवंताच्या चरणी अशी प्रार्थना करावी की, हे परमेश्वरा ह्यांना 'सद्बुद्धी' दे आणि मला 'सहनशक्ती' दे.

**प्रश्न**—पती आणि सासरा हे आपसामध्ये भांडण करीत असतील तर पत्नीने काय करावे ?

**उत्तर**—अशा वेळी आपल्या पतिला 'समज' देणे पत्नीचे कर्तव्य ठरते—उदा. या ठिकाणी जे कांही आहे ते सर्व आपल्या वडीलांचे आहे. आपल्या आईला सुद्धा वडीलांनीच आणलेले आहे. धन-संपत्ती, जमीन घर इत्यादी सर्व काही पिताजींनींच कमाविलेले आहे. त्यामुळे आपण सर्वतोपरी त्यांचा आदरच करावा. त्यांची प्रत्येक गोष्ट ऐकणे न्याययुक्त ठरते. हाच आपला खरा धर्म आहे; तसेच आपले कर्तव्य देखील आहे. कोणत्याही प्रकारची लिखा-पढी केल्या-शिवायच आपण त्यांच्या संपत्तीचे उत्तराधिकारी आहात. त्यामुळे त्यांची प्रत्येक गोष्ट आपण मान्य करावयास पाहिजे. त्यांनी एखादे वेळी जरी रागाने आपणाला काही म्हटले तरी आपण असा विचार करावा की, त्यांच्यासारखा कल्याण करणारा माझ्याकरीता दुसरा कोणीही नाही. त्यामुळे आपण त्यांच्या मनाला कधीही दु:खी करू नये. माझ्या अनुचित गोष्टीची आपण परवा न करता पिताजीच्याच प्रत्येक गोष्टीचा आदर करावयास पाहिजे.

**प्रश्न**—पती आणि पुत्र आपसात भांडण करीत असतील तर पत्नीने काय करावयास पाहिजे. ?

**उत्तर**—पत्नीने आपल्या पतिची बाजू घ्यावी आणि आपल्या मुलाला अशी समज द्यावी की, मुला तुझे वडील कांहीही म्हणत, असतील आणि कांहीही करीत असतील तरी वास्तविक दृष्ट्या तुझ्या प्रति त्यांच्या अंत:करणामध्ये तुझ्या हिताचीच भावना असते. ते कधीही तुझे नुकसान करणार नाहीं आणि दुसऱ्याने केलेले तुझे

नुकसान ते मुळीच सहन करणार नाहीं. त्यामुळे त्यांच्या अंतःकरणातील ह्या भावना जाणून घेऊन तू नेहमी त्यांची सेवा करण्यामध्येच तत्पर राहिले पाहिजे. तू एकवेळ माझ्याकडे दुर्लक्ष कर, माझा अनादर कर परंतु तुझ्या वडीलांचा मात्र नेहमीच आदर कर. आपले खरे स्वामी तर तेच आहेत. तू माझा अनादर केला तरी मी नाराज होणार नाही परंतु तुझे वडील मात्र कधीही नाराज व्हावयास नकोत. मी देखील त्यांना नेहमी प्रसन्न ठेवू इच्छिते आणि त्यांना नेहमी प्रसन्न ठेवणे हे तुझे देखील कर्तव्य ठरते.

**प्रश्न**—पत्नी आणि मुलगा हे जर आपसामध्ये भांडण करीत असतील तर पुरुषाने काय करावे ?

**उत्तर**—त्याने आपल्या मुलाला अशी समज द्यावी की, 'मुला, आपल्या आईला खुष ठेवणे हे तुझे विशेष कर्तव्य आहे. जगातील सर्व प्रकारच्या संबंधापैकी आईचा 'संबंध' अत्यंत 'उच्च' प्रतीचा आहे. त्यामुळे आपल्या पत्नीला वश होऊन कधीही दुःख देऊ नकोस.

पत्नीला अशी समज द्यावी की, तू, ह्याला नऊ महिने आपल्या उदरामध्ये वाढविले आहे आणि जन्म देऊन, दूध पाजून त्याला वाढविले आहे. आपल्या अंगावर मलमूत्र विसर्जन करून देखील तू त्याच्यावर कधीही रागावली नाहीस, उलट आनंदाने तू ते धुऊन टाकले आहेस. आता हा तुला कांही वेडे वाकडे बोलत असेल तरीही तू त्याला आपला आवडता पुत्र समजून क्षमा कर. कारण तू त्याची आई आहेस. पुत्र 'कुपुत्र' असू शकतो परंतु माता कधीही 'कुमाता' असू शकत नाही—'**कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति**'.

**प्रश्न**—कुटुंबामध्ये प्रेम आणि सुख-शांती कशी टिकून राहील ?

**उत्तर**—जेंव्हा मनुष्य आपला मूळ उद्देश विसरून जातो तेंव्हाच सर्व प्रकारची संकटे आणि विघ्न उत्पन्न होत असतात. जर तो आपल्या उद्देशाविषयी जागृत राहील की, कांहीही झाले तरी चालेल परंतु मला माझी आध्यात्मिक प्रगतीच करून घ्यायची आहे; असा निश्चय झालेला मनुष्य सुख-दुःखानां मुळीच घाबरणार नाही—'**मनस्वी कार्यार्थी न गणयति दुःखं न च सुखम्**' आणि आपल्या स्वार्थ आणि अभिमानाचा त्याग करणे त्याला मुळीच कठीण वाटणार नाही. स्वार्थ आणि अभिमान यांचा त्याग झाल्यानंतर व्यवहारामध्ये कोणत्याही प्रकारची अडचण येणार नाही. जेंव्हा मनुष्य आपलाच स्वार्थ पाहत असतो; आपलेच वर्चस्व राखू इच्छितो, तेंव्हाच व्यवहारामध्ये, परस्पर प्रेमामध्ये अडथळा उत्पन्न होत असतो

दुसऱ्याचे चांगले कसे होईल; दुसऱ्याचे हित कसे होईल; त्याचा मान सन्मान कसा होईल; त्याला सुख आणि आराम कसा मिळेल;—ह्या गोष्टी प्रत्येकाने आचरणात आणण्याचा प्रयत्न केला तरच संपूर्ण कुटुंब सुखी होऊ शकते. एखादे वेळी कुटुंबातील कोणी दुःखी झाले तरीही त्याचे दुःख स्थिर (टिकून) राहणार नाही; कारण जेंव्हा तो आपल्या दृष्टीकोनातून योग्य विचार करेल त्याच्या लक्षात येईल की यामध्ये देखील (इतरांनी माझ्या मनाविरुद्ध वागण्यामध्ये देखील) माझे हितच सामावलेले आहे. उदाहरणार्थ—ज्याप्रमाणे लहान मुलाची वृत्ती खेळण्याकडे अधिक असल्यामुळे शाळा शिकणे त्याला आवडत नाही; परंतु शाळा शिकण्यामध्ये परिणामी त्याचे हित सामावलेले असते; त्याप्रमाणे सुरूवातीला न आवडणारी, न पटणारी एखादी गोष्ट ऐनवेळी एखाद्याच्या लक्षात येणार नाही परंतु भविष्य काळात त्या गोष्टीचे महत्त्व त्याला नक्कीच कळून येईल. कदाचित त्याच्या लक्षात येणार नाही, तरीही

आपल्या नियतीवर आणि वर्तणुकीवर आपणाला संतोष होईल की आपण त्याचे कल्याणच इच्छित आहोत; तसेच आपल्या अंतःकरणामध्ये एक आंतरिक बल राहील की आपलेच म्हणणे योग्य आणि निर्णायक (ठोस) आहे. आपसामधील प्रेम वृद्धींगत होत असेल तरच परिवारामध्ये (कुटुंबामध्ये) सुख आणि शांती नांदत असते. वैयक्तीक स्वार्थ आणि अभिमानाच्या त्यागामुळे आपसातील प्रेम वाढीस लागते. जर स्वार्थ आणि अभिमानच नष्ट झाले तर प्रेमाशिवाय दुसरे काय शिल्लक राहील ? दुसरी व्यक्ती आपल्या वैयक्तीक स्वार्थाला वश होऊन आपल्यासोबत अनिष्ट वर्तन करीत असेल तेंव्हा आपल्या अंतःकरणात अशी भावना उत्पन्न होते की, मी या व्यक्तीसोबत चांगल्या प्रकारची वर्तणूक करीत आहे; तरी देखील ती व्यक्ती खुष होत नाही; त्याला मी काय करू ? आपल्या अंतःकरणात अशा प्रकारची भावना उत्पन्न होण्याला आपल्या ठिकाणी असलेली सूक्ष्म सुखलोलुपताच कारणीभूत आहे; कारण इतर व्यक्ती तत्काल सुखी आणि प्रसन्न झाल्यामुळे आपणाला सुख मिळत असते. त्यामुळे आपल्या अंतःकरणातील या सुखलोलुप वृत्तीचा पत्ता लागताच आपण तिचा त्याग करावयास पाहिजे. कारण आपणाला केवळ आपले कर्तव्य पार पाडावयाचे आहे; दुसऱ्यांचा आदर-सत्कार करून त्यांच्यावर प्रेम करावयाचे आहे. आपल्यामधील सद्भावनांचा आणि सद्वर्तणुकीचा त्यांच्यावर प्रभाव पडल्याशिवाय राहणार नाही. इतरांचे अंतःकरण कठोर असेल तर त्यांच्यावर प्रभाव पडला नाही तरी देखील 'आम्ही आपल्यातर्फे योग्यच केले'—ह्या भावनेच्या अनुषंगाने आपल्या अंतःकरणात संतोष राहील. त्यामुळे आपल्या अंतःकरणातील प्रेम कमी न होता वाढतच जाईल आणि कुटुंबामध्ये सुख-शांती नांदेल.



॥ श्रीहरिः ॥

# कैन्सरची औषधी तुळशी!

ह्या युगात कैन्सर एक असाध्य रोग मानला जातो. त्या रोगनाशाकरिता तुळशीचे पाने अचूक उपाय आहे-असे प्रत्यक्ष अनुभवात आले आहे. अहो! तीच तुळशी जिच्या माळा जपात व वारकरी भक्त आपल्या गळ्यात घालतात. तीच वृन्दा तुळशी भगवंताची प्रिय तुळशी. घरोघरी जीची पूजा केली जाते. प्रयोग करून सुखी व्हा.

एका मनुष्याला डॉक्टराने निदान केले कि ह्याला कैन्सर झाला. रोग्याला मुंबईच्या टाटा दवाखान्यात ठेवले. काही दिवस आराम झाला परन्तु रोगाने पुन्हा आक्रमण केले. डॉक्टरांनी म्हटले भगवंतावर भरवसा ठेवा उपचार करा.

त्या रोगीवर खालील प्रयोग केल्यामुळे एवढा लाभ झाला कि आजसुद्धा ७० वर्षच्या वयामध्ये तो चांगला आहे, खातो—पीतो, चालतो—फिरतो आहे.

प्रयोग—श्यामा तुळशीच्या ३०-३५ पानांना दही घुसळून काढलेल्या ताकात मिसळून प्यावे सकाळी संध्याकाळी हा प्रयोग करावा। दूध व दही जवळ जवळ १ ते १.५ किलो खावे. असे करण्याने थोड्याच दिवसात आराम होतो. तेल, मिर्ची इत्यादी वस्तूंचे सेवन करू नये.

जोरावर शहराच्या माझ्या मित्राने हा प्रयोग केला. प्रारंभात त्याला टाटा दवाखान्यात ठेवले. ४३ लाईट घेतले. परन्तु काही आराम नाही झाला. सर्व लोग दुःखी व हताश झाले. नंतर त्यांनी हा प्रयोग केला. त्याचा सम्पूर्ण रोग नाश झाला. चांगल्या रीतिने खातो—पीतो बोलचाल करतो त्याला नवे जीवन मिळाले.

**कल्याण वर्ष ४२ सं ५ पृ १५६ मधून**